# दिव्य कुरआनचा संदेश

लेखक

मायल खैराबादी

भाषांतर

बादशहा शेख – बार्शीकर

# अनुक्रमणिका

॥ अल्लाह असीम दयावंत व कृपावंत च्या नावाने ॥

# बद्रचे युध्द

## (इस्लाम व अश्रध्द यांच्यातील पहिले युध्द)

### युध्दाची कारणे

या लढाईची कथा पुढीलप्रमाणे आहे. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ईश्वरी आदेशानंतर इस्लामचा प्रचार मक्केत सुरु केला. आता त्याला १२ वर्षापेक्षाही जास्त कालावधी लोटला होता. परंतु फार कमी लोकांनी इस्लामचा स्वीकार केला होता. मक्केतील बहुसंख्य मूर्तिपूजक त्यांचे शत्रूच राहिले. शेवटी त्या मूर्तिपूजकांनी त्यांचा जीव घेण्याचे व त्यांची हत्या करण्याचे ठरविले. त्यांनी एकत्र येऊन प्रेषितांना मारण्याची तयारी सुरु केली. सकाळी सकाळी प्रेषितांच्या घरात घुसून त्यांची कत्तल करण्याचे ठरविले. कारण तेच इस्लामचे प्रमुख आधारस्तंभ व प्रचारक होते ना? आणि मग आपोआपच हा प्रचार थांबेल ना? मूळ तोडले की आपोआपच फांद्या खाली येतील ना?

ईश्वर त्याला जे पाहिजे तेच घडवून आणतो. त्याच्या इच्छेपुढे कोणीही जाऊ शकत नाही. मानवाचे मनोरथ जसेच्या तसे विनाकार्यवाही होऊन निरर्थक ठरतात. त्या दिवशीही तसेच घडले. मक्केतील प्रतिष्ठित मूर्तिपूजक सरदारांनी रात्री आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या घराभोवती वेढा घातला. नंग्या तलवारीनिशी शेकडों लढवय्ये त्यांच्या घराभोवती, डोळ्यांत तेल घालून पहारा देत होते. त्यांना शंका होती की कदाचित प्रेषित वेढ्यातून निसटून जातील. आणि त्यांना शंका होती तसेच झाले. ईश्वराने त्यांना सहीसलामत बाहेर नेले.

पवित्र कुरआनच्या सूरह-अल् अनफालमध्ये खालील उल्लेख आहे,

*"हे मुहम्मद (स.)! ती वेळ आठव, जेव्हा सत्य नाकारणारे तुझ्याविरुध्द युक्त्या योजित होते. तुझी कत्तल करावी अथवा कैद करावे. किंवा तुझ्या मायभूमधून हद्दपार करावे. अशी चाल ते मूर्तिपूजक खेळत होते. त्याच वेळी ईश्वरही त्याची चाल खेळत होता. ईश्वर सर्वश्रेष्ठ चाल रचणारा आहे."* (सूरह अल् अनफाल ८:३०)

अल्लाहने प्रेषित मुहम्मद (स.) यांना चेतावनी दिली की त्यांनी रात्री अंधारात

घराबाहेर पडावे आणि मूर्तिपूजकांपासून स्वत:स वाचवावे. कसलीही काळजी न करता पहाऱ्यामधून सरळ निघून जावे. ते तुम्हाला पाहू शकणार नाहीत. इतिहास लिहिणाऱ्यांनी, ''त्यावेळी मूर्तिपूजकांचे पहारेकरी सैन्य डुलक्या घेत होते,'' असे लिहिले आहे. अल्लाहच्या निर्देशाप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) संधी सापडताच त्या वेढ्यातून सुखरुप बाहेर पडले. या कानाचा पत्ता त्या कानाला लागला नाही. हा प्रसंग अल्लाहची करामत (चमत्कार) म्हणावा लागेल.

सकाळी जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) सुखरुप निसटले हे मक्केतील सरदारांना कळले तेव्हा ते वैतागून गेले. त्यांच्यात खळबळ माजली. प्रेषित निसटल्याने त्यांना फार वाईट वाटले. ''अरे! हे तर फार वाईट झाले.'' असे उद्‌गार अनेक मूर्तिपूजकांनी काढले. बक्षिसाची लालूच दाखवून अनेक तरुण योद्ध्यांना शोधण्यास उद्युक्त केले. ''प्रेषित मुहम्मद (स.) जेथे सापडतील तेथे त्यांना कैद करा अथवा त्यांचा शिरच्छेद करून त्यांचे मुंडके हजर करा.'' तुम्हास मोठे ईनाम दिले जाईल. परंतु दुर्दैव मक्केतील मूर्तिपूजकांचे! त्यांच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही, जेव्हा प्रेषित मदीनेस सुखरुप पोहोचले. मदीनेतील काही थोडे लोक सोडून अन्य सर्व मुसलमान झाल्याचे ऐकून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटले. मदीनेतील नवमुस्लिमांनी शपथपूर्वक इस्लाम कबूल करून प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याजवळ तन, मन व धनाने सर्वस्वाचा त्याग करण्याचे कबूल केले.

मदीनेत मुस्लिमांना आश्रय मिळणे हे मक्केच्या कुरैशाच्या दृष्टीने अत्यंत धोकादायक होते. मक्केतील व्यापाऱ्यांना इराककडे व्यापारी काफिले घेऊन मदीनेवरूनच रस्ता होता. त्यांचा इराककडे जाण्याचा हा जवळचा एकमेव मार्ग होता. आता मक्केच्या व्यापाऱ्यांना संकटाची चाहूल लागली. प्रेषित मुहम्मद (स.) मदीनेकडे गेल्यामुळे मुसलमानांकडून धोक्याची शक्यता वाढली. या धोक्याचा वेळीच बंदोबस्त करणे हे अत्यंत अगत्याचे आहे. वेळ टळून गेली तर हा धोका वाढेल व मग त्याचा बंदोबस्त करणे कठीण जाईल. म्हणून कुरैशांनी तयारी सुरू केली.

मक्केच्या कुरैश सरदारांनी मदीनेतील मुस्लिमांत फूट पाडण्याचे ठरवून, मदीनेतील सर्वांत श्रीमंत सरदार अब्दुल्ला बिन उबई याला पत्र लिहिले. या अब्दुल्लाची मदीनेचा बादशहा होण्याची इच्छा होती. तेच सूत्र लक्षात घेऊन कुरैशनी अब्दुल्लास लिहिले,

"आमच्या एका माणसास तुमच्या लोकांनी (मदीनेच्या) आश्रय दिला आहे. त्याने आमचा गुन्हा केला आहे. त्याला तुम्ही स्वत: लढाई करून जेरबंद करा अथवा त्यास मदीनेबाहेरे हाकलून द्या. तसे जर तुम्ही केले नाही तर आम्ही तुमच्यावर हल्ला करू. एवढेच नाही तर आम्ही मदीनेच्या सर्व पुरुषांची सर्रास कत्तल करू. तुमच्या स्त्रियांना आम्ही आमच्या जनानखान्यात दाखल करून घेऊ अथवा त्यांना गुलाम करू."

प्रेषित मुहम्मद (स.) मदीनेस आल्यापासून अनेकांनी इस्लाम स्वीकारला होता. मदीनेतील प्रमुख टोळ्या औज व खजरज या होत्या. त्यातील जवळजवळ सर्व लोकांनी इस्लाम स्वीकारला होता. त्या सर्वांनी ईश्वराचे लाडके देवदूत मुहम्मद (स.) यांचे नेतृत्व मान्य केले होते. त्यामुळे अब्दुल्ला बिन उबई नाराज झाला होता व तो इस्लाम व प्रेषित मुहम्मद (स.) यांचा द्वेष्टा झाला होता. मक्केच्या कुरैशांचे त्याला पत्र मिळताच त्याला आनंद झाला. आपले स्वप्न साकार होण्याची चिन्हे त्याला दिसू लागली. त्याने त्या पत्राच्या आधारामुळे मदीनेत गोंधळ माजविण्याचे ठरविले.

अब्दुल्ला बिन उबईला एक शूरपुत्र होता. त्याने इस्लाम स्वीकारला होता. त्याचेही नाव अब्दुल्लाच होते. त्याने इस्लामचा प्रचार व्हावा म्हणून तन, मन व धनाने सर्वोपरी प्रयत्न करण्याची शपथ घेतली होती.

अब्दुल्ला बिन उबईला फितवण्याच्या बरोबरच मक्केच्या कुरैशानी मदीनेतील मुस्लिमांना धमकावण्या देण्यास सुरुवात केली होती. धमकावण्याची एकच कथा तुम्हाला सांगण्याची माझी इच्छा आहे कारण माझे हे कथन लांबण्याची शक्यता आहे.

मदीनेचे एक सरदार साद बिन फआज हे मक्केस उमरा (छोटी यात्रा) करण्यास गेले होते. ते मक्केतील एक सरदार अुमय्या बिन खलफ यांच्या घरी उतरले होते. ते काबागृहाकडे प्रार्थनेसाठी निघाले. काबागृहाच्या दरवाज्यात त्यांची गाठ अबू जहलशी पडली. अबू जहलने साद बिन मुआजला अडविले. तो त्यांना म्हणाला, "हे साद, तुम्ही मदीनावाल्यांनी आमच्या शत्रूंना आश्रय दिला आहे. ते आमच्या धर्मापासून दूर गेले आहेत. ते आमच्या मूर्तिपूजनास आडवे येतात. तुम्ही त्यांचा पक्ष घेतला आहे. आणि आज काबागृहात प्रार्थनेसाठी आला आहात? देवाशपथ! तुम्ही अुमय्या बिन खलाफचे पाहुणे नसता तर तुम्ही येथून नक्कीच जिवंत परत गेला नसता."

साद बिन मुआज यांनी त्यांना उलट उत्तर दिले की, "अबू जहल, जर तुम्ही मला काबागृहात प्रार्थनेसाठी जाण्यात अडथळा केला तर मी तीव्रपणे तुमचा प्रतिकार करेन. लक्षात ठेवा यापुढे तुमच्या मक्केतील कोणताही व्यापारी काफिला इराक वगैरे देशाकडे जाऊ शकणार नाही."

साद बिन मुआज मदीनेला परत गेले. त्यांनी सर्व हकीगत प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या कानावर घातली. त्यांनी सर्व हकीगत शांतपणे ऐकून घेतली व दोन गोष्टी केल्या.

प्रथम प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आसपासच्या अरबी टोळ्यांबरोबर प्रेमाचे व सलोख्याचे संबंध वाढविले. त्यांच्याशी करार केला. मुस्लिमांच्या शत्रूबरोबर लढताना त्यांनी मदत करावी न पेक्षा त्यांनी शत्रूची मदत न करता तटस्थ राहावे.

त्याचबरोबर इराककडे जाणारे सर्व रस्ते त्यांनी आपल्या ताब्यात घेतले. त्या रस्त्यांवर मुस्लिमांच्या छोट्या छोट्या तुकड्या तैनात केल्या. त्या तुकड्यांची ते स्वत: मधूनमधून पाहणी करीत असत. साद यांनी मक्केत अबू जहलला जे उत्तर दिले होते त्याची मक्केकरांना खात्री पटावी, असाही प्रेषित मुहम्मद (स.) यांचा हेतु होता. मक्केकर जसे वागतील तसे मुस्लिमही उत्तर देतील.

मक्केतील कुरैशही स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीही लढाऊ तुकड्या मदीनेकडे पाठविण्यास सुरूवात केली. त्या मक्केच्या तुकड्यांनी मदीनेभोवताली लूटमारचे सत्र आरंभिले. मुस्लिमांनी त्यांचा प्रतिकार सुरू केला. मक्केच्या लोकांवर हल्ले सुरू करून त्यांनी लुटलेला माल परत मिळविला.

ज्यामुळे बद्रची लढाई लढली गेली, ते आता आपण पाहू या. शाबानच्या २० तारखेची ही कथा, म्हणजे फेब्रुवारी महिन्याचा शेवटचा आठवडा किंवा मार्चचा पहिला आठवडा. इसवी सन ६२३ चा हा काळ.

त्या दिवशी एक मोठा काफिला इराककडून परत मक्केस जाणार होता. त्यांच्याजवळ ५०,००० अशरफी (तात्कालीन नाणी) इतका माल होता. मात्र त्यांच्या रक्षणासाठी फक्त तीस ते चाळीस रक्षकच होते. त्या काफिल्याचा प्रमुख अबू सुफियान होता. त्याला मदीनेजवळून जावयाचे होते. त्याच्या मनात भीतीने घर केले. त्याला मुस्लिम काफिला लुटेल ही भीती वाटू लागली. त्याने एक सांडणीस्वार दूत मक्केकडे पाठवून लवकरात लवकर सैनिकी मदत आणण्यास सांगितले.

त्या दूताने मक्केत पोहोचताच सांडणी (उंटीण) चा लगाम उलटा ओढून जोरात हिसका दिला. त्यामुळे त्या सांडणीच्या नाकातून रक्त वाहू लागले. त्या सांडणीच्या कानावर वार करून कान कापले. स्वत:च्या शर्टाचा समोरचा भाग फाडून टाकला आणि मोठमोठ्याने ओरडू लागला, "हे कुरैशच्या लोकांनो! वाचवा! वाचवा!! तुमच्या व्यापाराचा माल वाचवा! प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मुसलमान सैनिक घेऊन अबू सुफियानच्या काफिल्यावर हल्ला केला आहे. तुम्ही घाई केली नाही, वेळेवर पोहोचला नाही तर, मला वाटत नाही काही माल शिल्लक राहील. सर्व लुटला जाईल. त्वरा करा! त्वरा करा!!"

त्या दूताच्या या बावचळलेल्या चर्चेकडे पाहून सर्व मक्केकरांना असे वाटले की, एक तर काफिला लुटला गेला असावा किंवा संकट अगदी डोक्यावर आले असावे. सर्व कुरैश सरदार एकत्र आले. त्यांनी लढाईची जय्यत तयारी केली. पाहता पाहता एक हजार लढवय्ये तयार झाले. तलवारी चमकू लागल्या. त्यापैकी सहाशे जण चिलखतधारी होते. शंभर सशस्त्र घोडेस्वार होते. पायदळ वगैरे मिळून सैनिकांची संख्या १२/१३ शेच्या पुढे गेली. मक्केचे सर्व सरदार त्या लष्कराबरोबर होते.

त्यांनी काफिला वाचविण्याचा निश्चय केला होताच पण त्याचबरोबर मदीनेवर हल्ला करून कायमचा सोक्षमोक्ष लावण्याचाही त्यांचा इरादा होता.

हे कारण झाले बद्रच्या लढाईचे. बद्र हे जेद्दाजवळ मदिनेच्या रस्त्यावरील एक ठिकाण आहे. येथेच मक्केचे मूर्तिपूजक व मुस्लिमांमध्ये पहिले युध्द झाले.

## प्रेषित मुहम्मद (स.) यांची काळजी

ईश्वराचे दूत प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे सर्व खबर आली. त्यांना वाटले की, आम्ही या वेळी मूर्तिपूजक कुरैशांचा प्रतिकार केला नाही तर आमचे नाव इतिहासातून कायमचे पुसले जाईल. तेव्हा त्यांच्याशी शौर्यानेच प्रतिकार केला पाहिजे. नबी मुहम्मद (स.) असा विचार करीत होते. मात्र मक्केहून हिजरत (स्थलांतर) करून आलेले मुस्लिम वेगळ्याच परिस्थितीशी मुकाबला करीत होते. त्यांच्याकडे युध्दाचे साहित्य तर नव्हते. ते रिकाम्या हाताने कसे लढू शकणार? त्यांचा फक्त प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर गाढा विश्वास होता. ते बहुतेक गरीब होते. मदीनेचे मुसलमान (अन्सार) अद्याप मक्केच्या हिजरत करून आलेल्या

मुस्लिमांशी इतके इस्लामशी एकरूप झाले नव्हते. प्रेषित मुहम्मद (स.) यांना मदीनेत येऊन दोन वर्षेही पूर्ण झाली नव्हती. त्यातच अब्दुल्ला बिन उबईसारखे दांभिक गुप्त विरोधात होते. ते तोंडावर मुस्लिमांची व प्रेषितांची स्तुती करीत आणि त्यांच्या मागे मुस्लिमांमध्ये फूट पाडण्याचा प्रयत्न करीत. ज्या आसपासच्या टोळ्यांशी प्रेषितांनी सख्य केले होते, त्या टोळ्याही मक्केच्या कुरैशांच्या दबावाखाली होत्या. त्यांना कुरैशांची भीती वाटत होती. अशा परिस्थितीत मक्केच्या शस्त्रसज्ज व मोठ्या लष्कराने हल्ला केल्यास मूठभर मुसलमान त्यांचा कसा प्रतिकार करू शकतील? ही शंका प्रेषितांना भेडसावीत होती. जरी हल्ला झाला नाही आणि कुरैशांनी स्वत:चा (अबू सुफियानचा) काफिला वाचवला तरी मुस्लिम नाउमेद होतील आणि शत्रूकडील लहान मुलेही युध्दास प्रवृत्त होतील.

त्यासाठी प्रेषितांनी इस्लामी आंदोलनास पुढे नेण्यासाठी आपल्याजवळ जी तुटपुंजी साधनसामुग्री आहे, तीच घेऊन आपण युध्दास प्रवृत्त झाले पाहिजे असा विचार केला. त्यासाठी जिवावर उदार झाले पाहिजे. त्यामुळे आपली ताकतही जोखली जाईल.

## तयारी

असा विचार करून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अन्सार व मुहाजिरांना एकत्र केले. त्यांच्यासमोर सर्व परिस्थिती सविस्तरपणे मांडली. ते म्हणाले,

"एकीकडे कुरैशांचा व्यापारी काफिला आहे आणि दुसरीकडून कुरैशचे लष्कर चालून येत आहे. अल्लाहने वायदा केला आहे की यापैकी कोणतेही एक तुम्हास प्राप्त होईल. बोला, आता तुम्ही कोठे जाऊ इच्छिता?"

विचारांती बहुतेकांचे मत पडले की काफिल्यावर हल्ला करावा. एक तर काफिल्यासोबत फार कमी लढवय्ये आहेत आणि त्यांच्याकडून लुटीची मोठी अपेक्षा आहे. परंतु प्रेषितांची इच्छा वेगळीच होती. त्यांनी त्यांचा प्रश्न पुन्हा विचारला. त्यावर एक मुहाजिर मिकदाद बिन उमर उभे राहिले आणि म्हणाले,

"हे रसूल! तुमचा अल्लाह जिकडे जाण्याचा आदेश देत आहे, तिकडेच चला. आम्ही आपणाबरोबर आहोतच. आम्ही बनी इस्राईलप्रमाणे असे म्हणणार नाही की 'जा तुम्ही आणि तुमचा ईश्वर दोघेच लढा. आम्ही तर येथेच बसून राहू.'

आम्ही मात्र असे म्हणतो की आपण व आपला सर्वांचा ईश्वर जिकडे जाऊ इच्छितो तिकडे जाऊ, आम्ही आपल्याबरोबर शेवटच्या माणसाच्या जिवात जीव असेपर्यंत लढू."

मुहाजिरांच्या वतीने मिकदाह यांनी वरीलप्रमाणे विचार मांडले. परंतु मूळचे मदीनावासी अन्सार गुपचुप उभे होते. मात्र अन्सारांचा सल्ला घेतल्याखेरीज प्रेषित काही करू इच्छित नव्हते. मदीनेतील अन्सारांनी इस्लाम कबूल करताना, प्रेषितांशी सहकार्याचा जो करार केला होता तो पाळण्याची कितपत तयारी आहे हे पाहणे आवश्यक होते. कारण ही इस्लामची पहिली लढाई होती. त्यासाठी पुन्हा अन्साराकडे वळून पुन्हा त्यांची इच्छा काय हे प्रेषितांनी विचारले. त्यावर अन्सारापैकी साद बिन मुआज उभे राहिले. ते प्रेषितांकडे वळून म्हणाले,

"आपण आम्हास पुन्हा विचारत आहात, तेव्हा मी स्पष्ट करू इच्छितो की, आम्ही अल्लाह व आपल्यावर ईमान आणले आहे. आपल्या मार्गदर्शनावर चालण्याचे आम्ही कबूल केले आहे. आपल्या आज्ञेच्या पालनाची शपथही घेतली आहे. तेव्हा हे नबी (स.) आपणास अल्लाहने जसा आदेश दिला असेल त्याप्रमाणे आपण वागावे. आम्ही सर्व अन्सार आपले आज्ञांकित आहोत. ज्याने आपणास नियुक्त केले आहे त्या अल्लाहची आम्ही शपथ घेतो. आपण समुद्रात उडी घेण्याचे ठरविले तर आम्ही आपल्या समवेत समुद्रात ही उडी घेऊ. आमच्यातील एकही जण मागे हटणार नाही. आम्हाला बरोबर घेऊन शुत्रूशी मुकाबला करण्यास आपण निघाला तर आम्हास आनंदच होईल. आम्ही युध्दात सर्वस्व अर्पण करून प्राणपणाने लढू. आम्हाला घेऊन आपण शत्रूला जाऊन भिडल्याने (लढण्याने) आम्हास आनंदच होईल. आमची तीव्र इच्छा आहे की आपल्या मनात अल्लाहच्या निर्देशानुसार जे आहे त्यात तुम्हाला यश मिळेल व आपण आनंदित व्हाल. आपण अल्लाहच्या भरवशावर आम्हास घेऊन चला.

यानंतर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मक्केकडून येणाऱ्या कुरैशांच्या फौजेचा मुकाबला करण्याचा निर्णय जाहीर केला. प्रेषितांचा हा निर्णय सामान्य निर्णय नव्हता. या निर्णयाने इस्लामचे भवितव्य निश्चित झाले.

हे लोक अन्सार व मुहाजिर मिळून केवळ ३१३ किंवा ३१७ होते, त्यांच्यापैकी फक्त दोघा–तिघांकडे घोडे होते आणि फक्त ७० उंट होते. त्यावर

आळीपाळीने तिघे–चौघे स्वार होत असत. फक्त ६० जणांना चिलखते होती. बाकी शंभर–सव्वाशे लोकांजवळ लढाईची व संरक्षणाची साधने अपुरी होती. मात्र त्यांच्या मनात हौतात्म्याची तीव्र इच्छा होती. काहीजण मात्र युध्दाच्या निर्णयाने हतोत्साहित (घाबरणे) झाले होते. त्यात अब्दुल्ला बिन उबईचे दांभिक लष्करही घाबरून गेले होते. त्यांना आपण मृत्यूच्या जबड्यात प्रवेश करीत आहोत असे वाटत होते. त्यांचे ईमान कच्चे होते. ते जाणूनबुजून मृत्यूला सामोरे जाण्यास तयार नव्हते. ते या युध्दास 'वेडेपण' समजत होते. त्याविरुध्द मुसलमान हौतात्म्याची संधी प्राप्त झाल्याने खूश झाले होते. अल्लाहच मनातील भेद जाणू शकतो. त्याने दांभिकांचे पितळ उघडे केले. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

*"विचार करा जेव्हा दांभिक आणि ते सर्व लोक ज्यांच्या हृदयाला रोग जडला आहे. (ते) म्हणत होते की या लोकांना तर त्यांच्या धर्माने पछाडले आहे. वस्तुत: जर एखाद्याने ईश्वरावर विश्वास ठेवला तर निश्चितच अल्लाह मोठा सामर्थ्यशाली व बुध्दिमान आहे."* —सूरह अल अनफाल ८:४९

त्यानंतर प्रेषित मुहम्मद (स.) ३१३ किंवा ३१७ मुहाजिर व अन्सारांसमवेत बद्र येथे आले. तेथे त्यांचा कुरैशांशी मुकाबला झाला. ती रमजान महिन्याची १७ तारीख होती. दोन्ही फौजांत फार मोठा फरक होता. मक्केच्या कुरैशाची फौज भरपूर साहित्य–सामुग्रीने ओतप्रोत होती. त्यांना गर्व होता. ते मुसलमानांना कुचलण्याची भाषा करीत होते. त्यांनी ऐषआरामाची साधनेही युध्दभूमीवर आणली होती. त्यांनी मद्य व नाच–गाणी करणाऱ्या वेश्याही बरोबर आणल्या होत्या. रात्री दारू पिऊन शेखी मिरवीत आणि वेश्यांची नाचगाणी पाहत.

मुसलमानांच्या छावणीत मात्र वेगळाच प्रकार चाले. रात्री सर्व मुस्लिम नमाज पढत असत आणि अल्लाहकडे केलेल्या गुन्ह्यांची माफी मागत. अल्लाहकडे मदतीसाठी विनंती करत. रात्री नमाज पढणारे मुसलमान दिवसा आपल्या शस्त्रांना तलवारीला धार लावीत असत. मुस्लिमाकडे सामान अत्यंत कमी, शस्त्रेही कमी तसेच उंट–घोडेही अत्यंत कमी होते. या सर्वांवर त्यांची ईश्वरनिष्ठा मात करून राहिली होती. त्यांची ईश्वरनिष्ठा भक्कम होती.

ते उंचवट्यावर आपल्या सैनिकांसह बद्र येथे कुरैशांच्या अगोदर आले होते. त्यांनी दरीतील उंचवट्यावर त्याच्या लष्कराची छावणी ठोकली. त्यानंतर कुरैशांच्या

सैन्याला उतारावर छावणी ठोकावी लागली.

दोन्ही फौजांकडे पाहिल्यावर कोणीही म्हणत नसे की मुसलमानांचा विजय होईल. परंतु अल्लाहने विजयाची हमी दिली होती. अल्लाहने विजयाचे वचन दिले म्हणूनच मुस्लिमांना विजयाची आशा होती. अल्लाहने मुस्लिमांना कशी मदत केली? जरा त्याची हकीगत ऐका. त्या हकीगतीमुळे जे मुस्लिम खरोखरी अंत:करणपूर्वक अल्लाहच्या आदेशाप्रमाणे वागतात त्यांना अल्लाह सर्वतोपरी मदत करतो, अशी शिकवण मिळते.

*"आणि तो प्रसंग आठवा जेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याशी फिर्याद करीत होता. उत्तरादाखल त्याने फर्माविले, मी तुमच्या मदतीकरिता लागोपाठ एक हजार दूत पाठवित आहे. ही गोष्ट अल्लाहने तुम्हाला केवळ याकरिताच सांगितली की तुम्हाला शुभवार्ता मिळावी. व तुमची मने त्याद्वारे समाधानी व्हावीत. आणि मदत जेव्हा कधी होते ती अल्लाहकडूनच होत असते. नि:संशय अल्लाह जबरदस्त आणि बुध्दिमान आहे."*

—सूरह अल् अनफल ८:९ ते १०

त्यावेळी, अल्लाहने प्रेषितांना विश्वास दिला होता आणि ही आनंदाची बातमीही ऐकविली होती. जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हे लक्षात आले होते की, मुस्लिमांपेक्षा कुरैशाचे लष्कर चौपट मोठे आहे आणि शस्त्रसामुग्रीही अपुरी आहे. तेव्हा त्यांनी अल्लाहकडे विनंती केली होती,

"हे माझ्या ईश्वरा! मक्केचे कुरैश फार घमेंडखोर आहेत आणि ते तुझ्या प्रेषितांना खोटे ठरवू पाहत आहेत. हे स्वामी! आता तू पूर्वी कबूल केल्याप्रमाणे आम्हास मदत पाठव. तू जर आम्हास मदत पाठविली नाही तर तुझी भक्ती करणारा कोणीही शिल्लक राहणार नाही. तुझी कोणीही भक्ती करणार नाही."

वरीलप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) अल्लाहची प्रार्थना करीत असतानाच दोन्ही सैन्ये समोर आली. तेव्हा सर्वांनी पाहिले की आदरणीय प्रेषित व त्यांच्यासमवेत मक्केहून मदीनेस आलेल्या मुस्लिमांचे भाऊबंद, वडील व आप्तगण हत्यारानिशी समोर उभे आहेत. आपल्या रक्ताची माणसे समोर उभी आहेत, ते हिजरत करून आलेल्या मुस्लिमांच्या काळजांचे तुकडे आहेत. त्यातच प्रेषिताचे जावईही होते. सर्व स्थलांतर केलेल्या मुस्लिमांची ही परीक्षेची वेळ होती. आपल्याच स्वकीयांशी लढायचे आपधर्मच होता. मक्केतील कुरैश सैन्यातील आप्तगण कुरैश सरदारांच्या दबावाखाली

आले असण्याची शक्यता होती, तरी मुस्लिमांना त्यांचे रक्त सांडणे भागच होते. मुस्लिम प्रेषितांच्या शिकवणीने प्रभावित झाले होते. सर्व मुस्लिमांच्या दुःखामुळे प्रेषितांनी अल्लाहला केलेल्या विनंतीचा परिणाम फार मोठ्या परिणामात्मक पध्दतीने पुढे घडून आला.

मदीनेतील अन्सारांचीही या वेळी परीक्षाच होती. त्यांनी तोंडाने 'ला इलाह इल्लल्लाह मुहम्मदुर रसुलुल्लाह' हा कलमा पढून (महावचन वदून) व प्रतिज्ञा करून इस्लाम स्वीकारला होता. तसेच त्यांनी मुहाजीर व इस्लामबद्दल आपुलकी दर्शविली होती, व मदतीचे आश्वासन दिले होते. ते अरबांत मानाचे स्थान असलेल्या कुरैशांविरुध्द लढण्यास सज्ज झाले होते. कुरैशांबरोबर लढणे म्हणजे एकाअर्थी सर्व अरबस्थानचे शत्रुत्व घेण्यासारखे होते. ज्यांनी इस्लामवर व प्रेषितावर निष्ठा ठेवली होती तेच फक्त असे धाडस करू शकत होते. मात्र अशांना जग मूर्ख समजत असते.

प्रेषित मुहम्मद (स.) या वेळी थोडे बेचैन झाले होते. त्यांची बेचैनी पाहून, त्यांचे रक्षण करावे म्हणून माननीय अबू बकर सिद्दिक (र.) प्रेषितांजवळच राहिले. ते त्यांच्या मागेच उभे होते. प्रेषित नमाज अदा करून अल्लाहजवळ दुआ (आशीर्वाद) मागत होते तेव्हा ते मागे उभे राहून आमीन (तथास्तु) म्हणत होते. अबू बकर सिद्दिक (र.) यांनी प्रेषितांना विनंती केली,

''हे नबी (स.)! अल्लाहने आपणास काय सांगितले?''

''सांगा, आज मुसलमानांसाठी खूशखबर आहे आणि काफिरांच्या (ईशद्रोही) बरबादीचा दिवस आहे'' प्रेषितांनी उत्तर दिले.

## अल्लाह ची मदत

अल्लाहने प्रेषित मुहम्मद (स.) यांना, कुरैशांविरुध्द लढण्यासाठी एक हजार फरिश्ते (देवदूत) पाठवण्याचे वचन दिले होते. फरिश्ते येऊन मुस्लिम सैन्यास ध्येयावर अचलनिष्ठा ठेवण्यासाठी व त्यांचे धैर्य कायम ठेवण्यास मदत करणार होते. त्यामुळे तुमचाच विजय होईल. प्रेषितांनी अल्लाहचे वचन (तुमचाच विजय होईल) सर्व मुस्लिमांना सांगितले. त्यामुळे मुसलमानांचे मनोधैर्य वाढले. प्रत्येक मोहिम सैनिक संतुष्ट व एकनिष्ठ असल्यासच यशस्वी होते. असंतुष्ट व अविश्वासामुळे प्रत्येक काम असफल होते अथवा नासून जाते.

जेव्हा दोन्ही सैन्ये समोरासमोर आले, तेव्हा ३१३ शस्त्रविहीनांवर १३०० शस्त्रसामुग्रीने परिपूर्ण असे विषम लष्कर दृष्टीक्षेपात आले. हा एकास चार असा संग्राम होता. हा इस्लामी लष्करास निराश करणाराच प्रकार होता. मुसलमानही शत्रूसैन्य पाहून दंग (आश्चर्यचकित) झाले काहीसे घाबरूनही गेले. यावर अल्लाहने मुस्लिम सैन्याचे मनोधैर्य वाढावे म्हणून थोड्या वेळासाठी मुस्लिम सैन्याला डुलकी लागावी असे केले. त्या वेळी शत्रू सैन्य फार थोडे आहे, असे मुस्लिम सैन्याला वाटावे असे केले. त्यामुळे कुरैशी सैन्याच्या मोठ्या संख्येची भीती मुस्लिमांच्या मनातून दूर पळाली.

त्यानंतर अल्लाहने लढाई सुरु होण्यापूर्वी पाऊस पाडला. मुस्लिम उंचवट्यावर होते. त्यामुळे त्यांच्या बाजूकडील वाळू माती उताराकडे वाहून गेली. मुस्लिमांच्या पायाखाली आपोआपच कठीण जमीन तयार झाली. मात्र उंचवट्यावरून पाणी उताराकडे वाहून गेले. तेथे कुरैशांचे सैन्य होते. त्या भागात सर्वत्र चिखलच चिखल झाला. त्यामुळे कुरैशाच्या सैन्यास चालणे कठीण झाले. त्यांचे पाय चिखलात रूतू लागले.

अल्लाहने काफिरांच्या कुरैशांच्या सैन्याच्या मनात भीती निर्माण केली. त्यांची मने घाबरून व्याकूळ झाली. तसेच मुस्लिमांच्या मनात शौर्य निर्माण करून त्यांना युध्दामध्ये मार्गदर्शन केले. त्याने शत्रूसैन्याच्या मानेवर व गुडघे वगैरे सांध्याच्या ठिकाणी वार करण्याचे सुचविले.

*"आणि तो प्रसंग आठवा जेव्हा की आपल्याकडून गुंगीच्या स्वरुपात तुम्हावर समाधान व निर्भयतेची स्थिती पसरवीत होता व आकाशातून तुमच्यावर पर्जन्यवृष्टी करीत होता. की जेणेकरून तुम्हास शूचिर्भूत करावे आणि तुमच्यावर सैतानाने टाकलेला अमंगळपणा दूर करावा. तुमचे मनोधैर्य वाढवावे. आणि त्यायोगे तुमचे पाय स्थिर करावेत. आणि तो प्रसंग जेव्हा तुमचा पालनकर्ता दूतांना इशारा करीत होता की, "मी तुमच्या समवेत आहे. तुम्ही श्रध्दावंतांना स्थिर राखा, मी लगेच या अश्रध्दावंतांच्या मनावर वचक बसवितो. तर तुम्ही त्यांच्या मानावर मारा व सांध्या सांध्यावर आघात करा." हे या कारणास्तव की या लोकांनी अल्लाह व त्याच्या पैगंबराचा विरोध केला. आणि जो अल्लाह व त्याच्या पैगंबराचा विरोध करतो. अल्लाह त्याच्यासाठी कठोर पकड करणारा आहे."* —सूरह अल् अनफाल ८:११ ते १३

*"आठवा तो प्रसंग जेव्हा हे पैगंबर (स.)! अल्लाह तुमच्या स्वप्नात त्यांना थोडे करून दाखवित होता. जर एखाद्या वेळेस त्याने तुम्हाला त्यांची (काफिरांची) संख्या जास्त करून दाखविली असती तर निश्चितच तुम्ही लोकांनी धीर सोडला असता. आणि युध्दाच्या बाबतीत तुम्ही तंटा सुरू केला असता. परंतु अल्लाहनेच त्यापासून वाचविले. निःसंशय तो मनाची स्थिती जाणणारा आहे."*

—सूरह अल् अनफाल ८:४३

अल्लाहने प्रेषित मुहम्मद (स.) यांना 'कोणता कुरैश सरदार कोठे मारला जाईल' हेही सांगितले. आता ही गोष्ट मुस्लिम सैन्याला कळल्यामुळे मुस्लिमांच्या मनातील भीती नाहीशी झाली.

## युध्दाची सुरवात

प्रथम युध्दासाठी सैन्य समोरासमोर उभे ठाकल्यानंतर कुरैशांनी वैयक्तिक युध्दाचा प्रस्ताव मांडला, 'दोन्ही पक्षांकडील प्रमुख शूर सरदारांचे वैयक्तिक युध्द व्हावे, नंतर सामुदायिक लढाई व्हावी.' कुरैशांचा त्यामागे धूर्त डाव होता. मुस्लिमांकडील शूर लढवय्ये वैयक्तिक लढाईत मारले गेले तर मुस्लिम सैन्य घाबरून जाईल व त्याचा पराभव करणे सोपे जाईल. मात्र अल्लाहने कुरैशांचा हा डाव त्यांच्यावरच उलटवला.

कुरैशेंनी एक चाल खेळावयाचे ठरविले. त्यांनी मक्केतील खानदानी ज्येष्ठ सरदारांना वैयक्तिक युध्दास पाठविण्याचे ठरवून त्यांना मैदानात उतरवले. त्यांना सांगितले गेले की तुम्ही मुस्लिमातील तरुणांना युध्दासाठी आव्हान द्या. जेणेकरून ज्येष्ठांचा मान राखण्यासाठी दबावाखाली लढतील. मग त्यांची कत्तल करणे सोपे जाईल. परंतु ते बिचारे जाणत नव्हते की इस्लामी तरुण मागील सर्व बंधने तोडून अल्लाहच्या धर्मासाठी शहीद होण्यास उतावळे झाले होते.

माननीय उमर यांच्या खानदान (घराणे) मधील एक अत्यंत श्रीमंत जो उमर यांच्या अगदी जवळचा नातेवाईक होता, तो रणांगणात गर्वाने तलवार फिरवीत स्वतःची शेखी मिरवू लागला. माननीय उमर पुढे आले आणि त्यांनी पाहता पाहता त्याचे शीर धडावेगळे केले. माननीय अुबैदा बिन जराहची त्यांच्या मामाशी जुंपली. पाहता पाहता अुबैदांनी मामाला धराशायी केले आणि भाच्याचा विजय झाला.

माननीय अब्दुर रहमान अबू बकर (जे आत्तापर्यंत मुसलमान झाले नव्हते, ते मैदानात उतरले. त्यांना पाहून माननीय अबू बकर पुढे सरसावले. परंतु प्रेषितांनी अबू बकर यांना थांबण्याचा आदेश दिला. (कारण अल्लाहने प्रेषितांना सांगितले होते की माननीय रहमान बिन अबू बकर पुढे इस्लाम स्वीकारणार आहेत. त्यामुळे माननीय रहमान त्यांच्या लष्करात परत गेले. एक बहादूर सरदार माननीय जुबैरचा नातेवाईक निघाला. तो मोठा शूर लढवय्या होता. जुबैर यांनी त्याचा सामना केला. त्याने भाल्याने त्यांच्यावर वार केला. माननीय जुबैर यांनी तो वार शिताफीने चुकविला. ते थोडक्यात वाचले. त्या वेळी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आत्या व जुबैर यांच्या माता हजर होत्या. त्या घाबरून ओरडल्या, ''हे प्रेषित (स.)!'' तेव्हा प्रेषितांनी त्यांच्या आत्यांना धीर दिला. ते त्यांना म्हणाले, ''घाबरू नका ते त्या रेड्याची नक्कीच कत्तल करतील.'' आता त्यांची कुस्ती सुरू झाली. दोघे एकमेकांत गुंतून खाली पाडण्याचा प्रयत्न करीत होते. ते दोघे उंचावर असल्यामुळे कुस्ती सर्वांना स्पष्ट दिसत होती. पाहता पाहता जुबैर यांनी त्या शक्तिशाली प्रतिस्पर्ध्यास खाली पाडले. ते त्याच्या छातीवर चढून बसले. जुबैरनी झटकन कमरेचा खंजर काढून त्याच्यावर वार करून त्यास यमसदनास सैतानाच्या भेटीस पाठविले.

सर्व हकीगत कोठवर लिहू! फक्त एक धडा देणारा प्रसंग सादर करतो. तिकडे लक्ष द्या.

याप्रमाणे जेव्हा कुरैश काफिरचे सरदार एका मागून एक कत्तल होऊ लागले. तेव्हा एक शूर सरदार उत्बा आपला पुत्र वलीद व भाऊ शैबासह रणांगणात उतरला. आतापर्यंत मदीनेतील अन्सारांनी युध्दात भाग घेतला नव्हता. तेव्हा तीन शूर अन्सार तलवारी परजीत त्यांच्यासमोर मुकबल्यासाठी उतरले. त्यांना पाहून उत्बाने त्यांना विचारले,

''तुम्ही कोण आहात?''

''आम्ही अन्सार आहोत.'' असे त्या तिघांनी त्याला उत्तर दिले.

त्यावर उत्बा त्यांना म्हणाला,

''तुम्ही आमच्याबरोबर युध्द करण्याइतके प्रतिष्ठित वा लायकीचे नाहीत, तरी दुसऱ्या कोणास पाठवून द्या. आम्ही खालच्या दर्जाच्या लोकांशी युध्द करणार नाही. तुमच्याबरोबर युध्द करणे हा आमचा अपमान आहे.''

तिन्ही अन्सार प्रेषितांकडे परत आले व त्यांनी सर्व हकिगत प्रेषितांना सांगितली. त्यावर प्रेषितांनी त्यांचे चुलते हमजा व चुलत भाऊ अली व थोरले चुलते अबू उबैदा बिन हार्श यांना इशारा केला. त्यानुसार ते तिघे मैदानात उतरले. हमजा हे उत्बास सामोरे गेले. अली आणि उबैदा उरलेल्या दोघांसमोर लढण्यास सज्ज झाले.

''हां! आता मजा येईल.'' असे म्हणून उत्बाने हमजावर जोराचा वार केला. हमजा सावधच होते.

त्यांनी अल्लाहच्या आदेशाप्रमाणे स्वत:वरील वार चुकवून, उत्बाच्या मानेवर वार केला. त्यानेही तो वार शिताफीने चुकविला. मात्र हमजांचा वार त्यांच्या खांद्यावर पडला. उत्बाने अंगावर दुहेरी चिलखत घातले होते. हमजांनी दुसरा वार सर्व शक्ती एकवटून केला. तेव्हा त्याची दोन्ही चिलखते चिरून त्याच्या छातीपर्यंत हमजांची तलवार घुसली. तो धराशायी झाला. त्यांनी अत्यानंदाने आरोळी ठोकली,

''मी हज्जाज याला पाणी पाजले. मला अबू तालीबचा मुलगा म्हणतात! कळले!!''

उत्बाला मारून हमजांनी मागे वळून पाहिले. अलींनी त्यांच्या शत्रूची कत्तल करून ते आता अुबैदांच्या मदतीला गेले होते. अुबैदा व त्यांच्या प्रतिस्पर्धी कुरैशने एकमकांस गंभीर जखमी केले होते. अलींनी अुबैदाच्या प्रतिस्पर्धी काफिराकडे झेप घेऊन त्याची कत्तल केली. अुबैदा त्या काफिराच्या हातून गंभीर जखमी झाले होते. अलींनी अुबैदांना आधार देऊन प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याजवळ आणले.

अुबैदांनी प्रेषितांना विचारले,

''हे प्रेषित (स.)! माझा आत्ता मृत्यू झाला तर मला हुतात्म्याचा (शहीदचा) दर्जा मिळू शकेल का?''

''का नाही! अवश्य तुम्ही शहीदच आहात, तुमची गणना 'शहीदां'तच केली जाईल.'' प्रेषित उत्तरले.

थोड्या वेळानंतर अुबैदांची प्राणज्योत मावळली ते शहीद झाले.

## घनघोर युध्द

यांप्रमाणे आपल्या शूर योद्ध्यास मुस्लिम सैन्य मुकले. कुरैशांचेही तीन नामवंत योध्दे युध्दात कामी आले. त्यामुळे कुरैशांनी मुस्लिम सैन्यावर प्रखर हल्ला केला. आता त्यांचा सेनापती अबू सुफियान होता. ते पाहून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मूठभर वाळू हातात घेऊन ती मूर्तिपूजकांच्या लष्कराकडे फेकली. त्याचबरोबर मुस्लिम सैन्यास शत्रूवर हल्ल्याची खूण केली. खूण दिसताच मुस्लिम सैन्य कुरैश सैन्यावर तुटून पडले. दोन्ही सैन्ये एकमेकास भिडली. घनघोर युध्द सुरू झाले. अल्लाहने प्रेषितांना वायदा केला होता. पवित्र कुरआनच्या सुरह अनूफालमधील १७ व्या आयतीत (श्लोकात) म्हटले आहे,

*"तेव्हा वस्तुस्थिती अशी आहे की, तुम्ही त्यांना ठार केले नाही तर अल्लाहने त्यांना ठार केले. आणि हे पैगंबर! रेती (वाळू) तू फेकली नाहीस तर अल्लाहने फेकली."*
—सूरह अनफाल ८:१७

घनघोर युध्द सुरू झाले, तलवारीला तलवारी भिडल्या. त्या वेळी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्वत:ची तलवार काढून उंच धरली व ते म्हणाले, "या तलवारीची इज्जत कोण वाढविल?"

त्या वेळी माननीय अबू दुजाना अन्सार म्हणाले, "हे प्रेषित (स.)! मी त्या तलवारीची इज्जत वाढवेन."

मग प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्वत:ची तलवार अबू दुजाना अन्सार यांना दिली व त्यांना बजावले,

"लक्षात ठेवा! या तलवारीने कोणाही स्त्रीची कत्तल करता कामा नये."

माननीय अबू दुजाना यांनी प्रेषितांची तलवार आपल्या हातात घेतली. प्रेषितांनी तलवार त्यांना दिली याचा गर्व होऊन ते घमेंडीत चालू लागले. त्यावर प्रेषित त्यांना म्हणाले,

"हे दुजाना, हा घमेंडखोरपणा अल्लाहला नापसंद आहे. निष्कारण गर्व करू नको."

माननीय दुजाना यांनी युध्दास सुरूवात केली. ते लढत लढत पुढे सरकू लागले. पुढे एके ठिकाणी अबू सुफियानची पत्नी हिन्दा कुरैश सैन्याला मोठमोठ्याने

ओरडून प्रोत्साहन देत होती. अबू दुजाना त्या ठिकाणी आले. त्यांनी समोर पुरुष शत्रू समजून, तिच्यावर वार करण्यास तलवार उचलली. त्याच वेळी ती स्त्री असल्याचे त्यांना जाणवले व प्रेषितांची आज्ञाही आठवली. त्यानी जोराने खाली येणारा वार सर्व शक्ती एकवटून रोखला. प्रेषितांच्या आज्ञेमुळे हिन्दा बचावली.

या लढाईत माननीय हमजा यांनी शहामृग पक्षाचे एक मोठे पीस डोक्यावरील पागोट्यावर लावले होते. त्या खुणेवरून ते युध्दभूमीवर कोठेही असले तरी ओळखू येत होते. त्यांनी या युध्दात कुरैशचे शूर योध्दे निवडून त्यांना मृत्यूच्या भेटीस पाठविण्यास सुरूवात केली होती. अनेक शूर कुरैश त्यांच्या हस्ते ठार झाले. दुसरे कोणी कुरैश मध्ये सापडले, त्यांनाही त्यांनी ठार मारले. काफिरापैकी एकमेकास विचारू लागले, ''डोक्यावर शहामृगाचे पंख खोवलेला वीर कोण आहे?'' थोड्याच वेळात ते माननीय हमजा आहेत हे सर्वांना कळून चुकले. कुरैश म्हणू लागले, ''याच माणसाने आमचे सर्वांत जास्त नुकसान केले आहे.''

या युध्दात अल्लाहने मुसलमानांना विजय मिळवून दिला आणि कुरैश मोठे लष्कर आणि भरपूर साहित्य असतांनाही पराभूत झाले. त्यांचे ७० बहादूर कुरैश मारले गेले. तसेच ७० कुरैशांना मुस्लिमांनी कैद केले. कुरैशांचे पुष्कळसे युध्दसाहित्यही मुस्लिमांच्या हाती लागले.

मुस्लिमांचा विजय झाल्याची बातमी जेव्हा अरबस्थानातील इतर टोळ्यांना कळली तेव्हा त्यांनाही आश्चर्याचा धक्का बसला. सर्व टोळ्यांवर मुस्लिमांचा धाक बसला.

## कैद्यांशी वर्तन

या लढाईनंतर ताबडतोब प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासमोर दोन प्रश्न निर्माण झाले. त्यापैकी पहिला प्रश्न युध्दकैद्यांचा होता. या युध्दकैद्यांशी कसे वागावे अथवा त्यांना कसे वागवावे? काहीजणांचे म्हणणे होते की या युध्दकैद्यांची सर्रास कत्तल करावी. कत्तल करावी यासाठी माननीय उमर यांनी कडक बाजू घेतली होती. त्यांनी सुचविले की युध्दकैद्यांपैकी ज्याचे आप्त मुस्लिम आहेत, त्यांनीच स्वतःच्या हस्ते त्यांच्या नातलगांची कत्तल करावी. तर माननीय अबू बकर यांचे म्हणणे असे पडले. की, ''सर्व कैदी आपलेच भाऊबंद आहेत. त्यांच्याकडून दंड (फिदया) घेऊन त्यांना

मुक्त करावे.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माननीय अबू बकर यांचे म्हणणे मान्य केले. ज्या कैद्यांनी फिदयाची रक्कम भरली त्यांना मुक्त करण्यात आले. उरलेल्या कैद्यांना मदीनेतील मुस्लिमांत वाटप करण्यात आले. त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी मुस्लिमांवर सोपविण्यात आली. युध्दकैद्यांना कसलाच त्रास होऊ नये अशी दक्षता घेण्यास बजावण्यात आले. परिणामत: मुस्लिम स्वत: उपाशी राहिले पण त्यांनी युध्दकैद्यांची सर्व प्रकारे काळजी घेतली. या बाबतीत युध्दकैद्यांनीही मुस्लिमांची तरफदारी केली.

## कायद्याची मनोवेधक चर्चा

या लढाईत प्रत्यक्ष प्रेषित मुहम्मद (स.) यांचे जवळचे नातेवाईकही युध्दकैदी म्हणून पकडले गेले होते. त्यात त्यांचे जावईही होते. तसेच त्यांचे नातेवाईक व त्यांच्या घराण्याचे सरदार माननीय अब्बास हेही होते.

प्रेषितांनी माननीय अब्बास यांना फिदया (दंड) मागितला. त्यावर माननीय अब्बास म्हणाले, ''तुम्हास माहीत आहे की मी तुमचा सुरूवातीपासूनच चाहता आहे. मी नेहमीच तुमची बाजू घेतली आहे. तुमची सततच मदत करीत आहे. एवढेच नाही तर मी मनोमन इस्लाम कबूल केला आहे. माझ्याकडून दंड मागणे योग्य नाही.''

प्रेषितांनी आपले चुलते अब्बास यांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले. ते म्हणाले, ''इस्लाम कबूल करण्यासाठी ते जाहीर करणे आवश्यक असते. पण तुम्ही तसे जाहीरपणे इस्लाम कबूल केला नाही. तेव्हा तुम्ही दंड भरणेच योग्य होईल.''

त्यावर माननीय अब्बास यांनी स्वत:च्या गरिबीचे रडगाणे सुरू केले. तेव्हा प्रेषित म्हणाले,. ''अहो! तुम्ही घरी लपवून ठेवलेली रक्कम तर तुमच्याजवळ आहे ना?''

त्यावर माननीय अब्बास अचंभित झाले. त्यांनी विचारले, ''हे आपणास कसे कळले?''

त्यावर प्रेषित म्हणाले, ''मला हे अल्लाहने सांगितले आहे.''

त्यावर माननीय अब्बास यांना गप्प बसावे लागले. नंतर माननीय अब्बास यांनी

स्वत:च्या व त्यांच्या जवळच्या कुटुंबियांच्या दंडाची रक्कम अदा करून सुटका करून घेतली. प्रेषितांचे जावई अबूल आस यांच्याजवळ दंड भरण्यासाठी काहीही नव्हते. त्यांना दंड मागितला गेल्यावर ते उदास झाले. ते म्हणाले, "अल्लाहची शपथ! मी लबाडी करणार नाही. मला जर आपण मुक्त केले तर मी मक्केहून माझ्या दंडाची रक्कम पाठवून देईन."

मात्र प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अबुल आस यांना कसलेही उत्तर दिले नाही. ते शांत बसले. त्या वेळी इतर मुस्लिमांच्या लक्षात आले की प्रेषित प्रत्यक्ष जावयासदेखील कसलीही सवलत देण्यास तयार नाहीत. तेव्हा इतर मुस्लिम प्रेषितांना शिफारस करीत म्हणाले, "अबुल आस हे शब्दाचे सच्चे आहेत. ते मक्केहून नक्कीच दंडाची रक्कम पाठवून शब्दास जागतील."

शेवटी अबुल आस यांना त्यांनी मक्केला गेल्यावर दंडाची रक्कम व प्रेषित मुहम्मद (स.) यांची मुलगी व अबुल आस यांची पत्नी जैनब यांना मदीनेस पाठवून द्यावे, असे ठरले.

ठरल्याप्रमाणे अबुल आस मदीनेहून मक्केस गेले. तेथे गेल्यावर सर्व हकीगत त्यांनी आपल्या पत्नी जैनब यांना सांगितली. त्यावर घरात दंडाची रक्कम भरण्याची परिस्थिती नाही हे जैनब यांनी पतीस सांगितले. परंतु अचानक त्यांना घरात एक हार दिसला जो त्यांच्या आई खदिजा यांनी जैनबना भेट दिला होता. शेवटी दोघांनी चर्चा करून ती आईची आठवण असलेला हार मदीनेस प्रेषितांकडे पाठविला. हा हार जेव्हा प्रेषितांनी पाहिला तेव्हा ते काही क्षण स्तब्ध झाले. त्यांच्या प्रिय पत्नी खदिजांची त्यांना आठवण झाली. माननीय खदिजांनी इस्लामसाठी तन, मन व धनाने केलेली सेवा आठवली. प्रेषितांच्या कठीणात कठीण काळात त्यांनी केलेले बहुमोल कार्य आठवले.

प्रेषितांच्या चेहऱ्यावर उमटलेली व्यथा पाहून काही मुस्लिम त्यांना म्हणाले, "हुजूर! आपण हा हार बेटी जैनबना परत करा. आमची काही हरकत नाही."

सर्वानुमते तो हार अबुल आस यांना परत केला. मुस्लिमांनी हार परत करण्याचा अबुल आस यांच्यावर मोठा परिणाम झाला. त्यांनी इस्लाम स्वीकारला. जैनब यांना त्यांनी मदीनेस वडिलांकडे पाठविले स्वत:ही काही दिवसानंतर मदीनेस येऊन स्थायिक झाले.

# युध्दलुटीच्या मालाचे वाटप

शत्रूच्या सैन्याचा पराभव झाल्यानंतर त्यांच्या मागे राहिलेले साहित्य व माल यास युध्दलुटीचा माल म्हणतात. जिंकलेले लष्कर त्या मालावर कब्जा करते. ती लूट असते.

प्रेषित मुहम्मद (स.) यांची इस्लाम प्रसारानंतर झालेली ही पहिली लढाई होती. युद्धलुटीच्या मालाबद्दल अद्याप अल्लाहकडून काही आदेश प्राप्त झालेला नव्हता. आतापर्यंत अशी पध्दत होती की शत्रुसैन्याकडून ज्या सैन्याने पराभव करून माल लुटून आणला आहे तो त्या सैनिकाचा समजला जाई. जेव्हा मक्केचे लष्कर पराभूत होऊन पळत सुटले तेव्हा इस्लामी लष्करातील बहुतेक जण शत्रूकडील माल व धन लुटण्यात गुंग झाले. फार थोड्या मुस्लिमांनी शत्रू सैन्याचा पाठलाग केला. त्याच वेळी सर्व मुस्लिम सैन्याने कुरैश सैन्याचा पाठलाग करून बीमोड केला असता, तर पुढे मुस्लिमांपुढे संकटे उभी राहिली नसती. त्याचा फायदा अबू सुफियानने घेतला व कुरैशांचे बचावलेले सैन्य घेऊन मक्केस पळून गेला.

ज्या सैनिकांनी पराभूत सैन्याचा पाठलाग करण्याऐवजी जी लूट मिळविली होती तीवर ते हक्क सांगू लागले. शत्रूचा पाठलाग करण्यास गेलेल्या सैन्यास लुटीत काही मिळाले नव्हते. शिवाय प्रेषितांचे जे अंगरक्षक दल होते, त्यांनाही लुटीत भाग घेता आला नाही. म्हणून त्यांनाही काही मिळाले नाही. शत्रूचा पाठलाग करणाऱ्या सैनिकांचे म्हणणे उसे होते की आम्ही शत्रूचा पाठलाग करून त्याला दूर हाकलून लावले नसते तर आम्हालाही लूट करता आली असती. तसेच प्रेषितांच्या अंगरक्षकांचेही म्हणणे होते. त्या दोन्ही पक्षांनी लुटीच्या मालावर आमचाही बरोबरीचा हिस्सा असल्याचा दावा केला.

तिन्ही गट आपापल्या विचारावर दृढ होते. तेव्हा प्रेषितांनी हा विवाद वाढू दिला नाही. त्याच वेळी त्यांच्यावर अल्लाहकडून वही (दिव्यप्रकटन) अवतरली ती वही पवित्र कुरआनच्या आठव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात (आयत) दिलेली आहे.

*"हे नबी! तुम्हाला अनफालसंबंधी विचारतात त्यांना सांगा, हे अनफाल अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आहेत. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा. आपसातील संबंध सुधारा आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराची आज्ञा पाळा."* सूरह अनफाल ८:१

वरील आयतीतील अनफाल या शब्दाचा अर्थ ''हक्कापेक्षा जे जास्त मिळते ते'' असा सय्यद अबुल आला मौदुदी (र.) यांच्या मराठी भाषांतरात दिला आहे. अनफाल हे नफ्ल या शब्दाचे अनेक वचन आहे. नफ्ल याचा अर्थ 'स्वेच्छा सेवा' असा होतो. स्वेच्छा सेवेबद्दल मालक जे बक्षीस देतो ते अल्लाह स्वखुशीने देतो. ते कृपाप्रसादच आहे. असा कृपाप्रसाद अल्लाहचा असतो, परंतु तो दासांना समान लेखून समान देतो. म्हणून या आयतीद्वारे अल्लाहने जी युध्दलूट (गनीम) मिळाली ती सर्वांची समान आहे, असा आदेश दिला.

१) अल्लाहने वचन दिले होते की दोन गोष्टींपैकी एक देईन. कुरैश सैन्यावर विजय किंवा इराककडून परत येणाऱ्या तांड्यातील चाळीस हजार दिरहमचा माल.

२) अल्लाहने मुस्लिमांच्या मदतीसाठी हजार देवदूत (फरिश्ते) पाठविले, त्या देवदूतांनी मुस्लिमांची मने धीट केली. त्यांची श्रध्दा भक्कम केली आणि अश्रध्दावंतांच्या हृदयांत भीती निर्माण केली.

३) मुस्लिमांना काही वेळासाठी गुंगी (अर्धवट झोप) घातली. मुसलमानांना कुरैशचे सैन्य कमी असल्याचे भासविले. मुसलमानांकडील जमिनीचा भाग पाऊस पाडून कठीण केला आणि कुरैशांकडील जमिनीचा भाग चिखलाचा बनवला जेणेकरून त्यांचे (कुरैश सैन्याचे) पाय जमिनीत रूतत होते.

*''तेव्हा वस्तुस्थिती अशी आहे की, तुम्ही त्यांना ठार केले नाही, तर अल्लाहने त्यांना ठार केले. आणि हे पैगंबर! तू रेती फेकली नाही तर अल्लाहने फेकली.''*

—सूरह अनफाल ८:१७

या आयतीद्वारे, प्रेषितांनी मूठभर वाळू शत्रूसैन्यावर फेकली, त्याकडे लक्ष वेधले आहे. त्याच वेळी दुष्मनांवर हल्ला करण्याची सूचनाही अल्लाहने दिली. त्या अर्थी शत्रूसैन्याची कत्तल तुम्ही (मुस्लिमांनी) केली नाही. ती अल्लाहनेच केली आहे, असे सुचविले आहे. याद्वारे अल्लाहच्या शक्तीची ओळख व्हावी. त्याप्रमाणे सर्व काही अल्लाहनेच करविले आहे. हे सर्व मुस्लिमांनी जाणून घेतले. त्यांनी अल्लाहपुढे झुकून, त्यांनी जो माल लूट म्हणून स्वत:जवळ ठेवला होता. तो माल आणून प्रेषितांपुढे त्याचा ढीग घातला. त्यांनी अल्लाहचे आभार मानले व लुटीच्या मालाच्या अपहरणामुळे आपणास अल्लाहच्या रागापासून मुक्ती मिळाल्याने, सुटकेचा श्वास सोडला.

सूरह अनफालमधील आयत (श्लोक) २७-२८ मध्ये खालीलप्रमाणे उल्लेख आला आहे.

*"हे श्रध्दावंतांनो! जाणूनबुजून तुम्ही अल्लाह व त्याच्या प्रेषितांशी बेईमानी करू नका. आणि आपल्या अमानतीमध्ये अफरातफर करू नका. चांगले समजून असा की, तुमचे धनद्रव्य व तुमची संतती खरे पाहता परीक्षा आहे."*

*—सूरह अनफाल ८:२७-२८*

प्रेषितांनी लुटीच्या मालाची वाटणी करताना अल्लाहचा आदेश पाळून सर्वांना समान वाटणी दिली. त्यामुळे सर्व मुस्लिम खूश होऊन अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आज्ञा तत्परतेने पाळीत होते.

## युध्द-लुटीच्या वाटणीसाठी कायदा

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी युध्दलुटीच्या मालाचा पाचवा हिस्सा बैतुलमाल (सरकारी खजिना) मध्ये जमा करावा. त्याचा उपयोग गोरगरीब व राज्याच्या कल्याणासाठी वापरण्यात यावा व उरलेले चार भाग (४/५) युध्दात भाग घेतलेल्या पूर्ण फौजेत वाटण्यात यावा असा आदेश दिला. पवित्र कुरआनमध्ये याबाबत खालील आदेश देण्यात आले आहेत.

*"आणि तुम्ही समजून घ्या. युध्दलुटीच्या रुपाने तुम्ही जो माल हस्तगत केला आहे, त्याचा पाचवा भाग अल्लाहचा आणि त्याचे पैगम्बर (स.) व नातेवाईक, अनाथ आणि गरीब आणि प्रवाशांचा आहे."*

बद्रच्या युध्दात ज्यांनी भाग घेतला होता, त्या मुस्लिमांसाठीच फक्त अल्लाहने ही 'शिकवण' पाठविली नव्हती. आजसुध्दा सूरह अनफाल (८ वा अध्याय) आम्ही सार्थक नित्य पठण केली, (तिलावत केली) तर आजही आमचे अनेक प्रश्न सुटतील व जीवन सुखाचे होईल. आमच्यामध्ये पालनकर्त्याबद्दलच्या भावनात (जज़्बा) वाढ होईल. म्हणजे आमच्यामध्यें धन–संपत्तीची हाव असते ती कमी होईल. आखिरतच्या (न्यायाच्या) दिवसाची भीती निर्माण होईल. त्यामुळे आमचे कल्याणकर्ते प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या श्रेष्ठत्वाचा शिक्का आमच्या मनावर उमटेल. त्यांचे मोठेपण आम्हास भावेल. आम्हाला ईश्वरकृपेने, प्रेषितांच्या पावलावर पाऊल टाकून चालण्याची प्रेरणा मिळेल.

# हत्तीवाले

हे हत्तीवाले कोण होते? त्यांच्या कथेवरून आम्हास कोणती शिकवण मिळते? आपणास आपोआपच ही सत्यकथा वाचल्यावर त्याचे उत्तर मिळेल. थोडक्यात या सत्यकथेपासून मुस्लिमांना व मुस्लिमांचा निष्कारण द्वेष करणारांनाही धडा मिळेल. जे इस्लामचा द्वेष करतात, त्यांच्या कृतीने इस्लामचे काही बिघडत नाही तर ते स्वत:च्या पायावर दगड पाडून घेतात. या सत्यकथेमुळे मुस्लिमांना दिलासा मिळतो. हे इस्लामचा द्वेष करणाऱ्यांना भीतिदायक व घाबरून सोडण्यास पुरेसे आहे.

*''काय तुम्ही पाहिले नाही? अल्लाहने हत्तीवाल्यांची काय स्थिती केली? काय त्यांचा डाव बेकार केला नाही? आणि त्यांच्यावर पक्ष्यांचे थवेच्या थवे पाठविले. ते त्यांच्यावर (हत्तीवाल्यांवर) खडे दगड मारीत होते. मग त्यांची अशी दशा करून टाकली जसा (जनावरांनी) खाल्लेला भूसा.''* —*सूरह अलफील १०५:१ ते ५*

या! आता ती सत्यकथा आपण जाणून घेऊ या. सुमारे साडेचार हजार वर्षांपूर्वी अनेक प्रेषित होऊन गेले. त्यापैकी एक माननीय इब्राहीम हे अल्लाहचे प्रेषित होते. त्यांनी अल्लाहच्या आदेशावरून मक्का शहरात 'काबा' नावाचे पवित्र तीर्थ वसविले. तेथे जवळजवळ २० मीटर लांब २० मीटर रूंद व २० मीटर उंचीचे काबा ही पवित्र वास्तु वसविली. अल्लाहची प्रार्थना तेथे करावी हा हेतु होता. अरबी जनतेने तेथे येऊन यात्रा व अल्लाहची उपासना करावी, असा आदेश दिला. हा हुकूम अल्लाहने दिलेला असल्यामुळे सर्व अरबजन तेथे येऊन अल्लाहची उपासना करणे आपले कर्तव्य समजत असत. काबा येथे येऊन यात्रा केलेल्या व्यक्तीस हाजी म्हटले जाते व मक्केतील 'काबा' तीर्थास 'हज' ही संज्ञा दिली जाते. थोडक्यात हजची यात्रा करणारा तो 'हाजी'!

अल्लाहने 'काबा' या इमारतीस (तीर्थास) मोठेपण प्रदान केले आहे. या इमारतीइतकी श्रेष्ठता, जगातील इतर कोणत्याही इमारतीच्या वाटेस आली नाही. मक्केतील 'काबा' तीर्थाचे श्रेष्ठत्व शत्रूच्याही मनात सलत असे. आजही अश्रध्दावंतांच्या मनात 'काबाचे' श्रेष्ठत्व सलत आहे. 'काबा' क्षेत्राचे महत्त्व कमी व्हावे, म्हणून अनेकांनी अनेक प्रयत्न केले. एका कवीने म्हटले आहे, ते सत्यच आहे.

''वह शमा क्या बुझे। जिसे रोशन खुदा करे।''

भाषांतर - 'तो दीप विझेल कसा? ज्याचा प्रज्वलिता खुदा आहे' म्हणजे - जो दिवा प्रत्यक्ष ईश्वराने पेटविला आहे तो विझणे शक्य नाही. सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे. जगातील अनेकजण 'काबा'चे महत्त्व कमी व्हावे असा प्रयत्न करीत असताना मात्र, काबाचे महत्त्व दिवसेंदिवस वाढतच चालले आहे आणि विरोधक मात्र तोंडघशी पडत आहेत.

या अनेक अश्रध्दावंतांपैकी एकजण 'अबराह' नामक आहे. मक्केच्या दक्षिणेस असलेल्या या बादशहाची कथा धडा शिकविणारी आहे.

ही सत्यकथा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या जन्मापूर्वी पन्नास दिवसांपूर्वीची आहे. 'अबराह' हा यमनचा बादशहा होता. त्याने मक्केत होणाऱ्या 'हज' यात्रा पाहिल्या होत्या. अबराह हा स्वत: ख्रिश्चन धर्मिय होता. त्याने 'काबाचे' महत्त्व पाहिले होते. विनाआमंत्रण लाखो यात्रेकरू मक्केस येतात, हे पाहून 'अबराह' मनात जळफळू लागला. मक्केस येणाऱ्या 'हज' यात्रेकरूंमुळे मक्केचे महत्त्व वाढले. अरबस्थानातली अरब मक्केकरांना त्यांचे पुढारी समजू लागले होते. त्यांची इज्जत करीत असत.

अबराहला आपल्या राज्याची अशीच इभ्रत वाढावी आणि सर्व अरबस्थानाने आपले नेतृत्व मान्य केल्यास यमनच्या वैभवांत भर पडेल म्हणून त्याने यमनच्या राजधानीत अत्यंत सुंदर असे चर्च (ख्रिश्चनाचे उपासना घर-देऊळ) बांधले. त्यानंतर त्याने आपल्या दरबारात राजधानीच्या चर्चमध्ये यात्रेस येण्याचे फर्मान काढले. त्याचप्रमाणे 'काबा' ऐवजी यमनच्या चर्चमध्ये 'हज'च्या यात्रेस यावे 'काबा'कडे 'हज' साठी जाऊ नये अशी व्दाही फिरविली.

त्याने चोहोकडे फिरवलेल्या द्वाहीचा दुसरा एक अर्थ होता की मक्केचे लोक त्याचा हुकूम ऐकून संतापतील, त्यांना वाईट वाटेल. ते काहीतरी विरोधी कृती करतील व त्याला मक्केवर हल्ला करण्याचे कारण मिळले. त्याचे हे कृत्य अलीकडील राजकारणीं लोकांच्या वर्तनाशी सुसंगत आहे. आपल्यापेक्षा कमी शक्तीच्या कमजोर लोकांना सतावण्यासाठी ही युक्ती अलीकडील दुष्ट लोक वापरतात. काही वेळा कमजोरांच्या पूर्वजांबद्दल अपशब्द वापरून त्यांना भडकावित असतात. कधी त्यांच्या महत्त्वाच्या श्रध्दास्थानास दोष देऊन लोकांना ते क्रुध्द करण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळे त्यांच्या तोंडून अयोग्य शब्द बाहेर पडतात. त्यांना असे हुसकावून क्रोध येईल

असे करतात व त्यांच्या अयोग्य वचनासाठी त्यांच्याशी भांडणे काढतात. अशीच खेळी अबराहही खेळत होता. त्याने मक्केकरांना भडकविण्याचा असाच प्रयत्न करून पाहिला. ज्यामुळे त्याला मक्केवर स्वारी करण्यास कारण मिळावे. अबराहनेही असाच काहीसा प्रकार मक्केकरांना युध्दास प्रवृत व्हावे म्हणून केला. जसा हा प्रकार कोणीतरी, गाय कापून तिचे मस्तक वा मांस मंदिरामध्ये फेकावे वा मुसलमानांना निषिध्द डुकराचे मस्तक कापून मशिदीमध्ये टाकावे व ते जातीय दंगलीस कारणीभूत व्हावे असा होता.

अबराहनेही चर्च कोणीतरी अन्य धर्मियांने अपवित्र केले, असा दावा केला. ते काम मुस्लमानाशिवाय कोणीही केले नसेल असा जावाईशोध लावला. जोपर्यंत मी काबा या पवित्र क्षेत्राचा नाश करणार नाही, तोपर्यंत मी विश्रांती घेणार नाही, अशी प्रतिज्ञा केली.

त्यानंतर इ. स. ५७१ मध्ये सोबत साठ हजार फौज आणि तेरा हत्ती घेऊन मक्केवर स्वारी करण्यास निघाला. वाटेत त्याला एक अरबी सरदार 'नजीर' याने त्याला अडविण्याचा प्रयत्न केला पण त्याला अबराहच्या सैन्याने अटक केली. पुन्हा पुढे आणखी एक अरब सरदार 'नजील' आडवा आला पण तो युध्दात हरला. त्यांलाही अटक करण्यात आली. त्याला ठार मारण्याचे ठरले. इतक्यात त्याने अबराहला वाळवंटातून मक्केचा रस्ता दाखविण्याचे कबूल केले. त्याची विनंती अबराहने मान्य केली. त्याला 'वाटाड्या' म्हणून अबराहने नेमले.

'नजील' वाळवंटात वाट दाखवित दाखवित ताएफजवळ 'अबराह'ची फौज घेऊन आला. त्याची प्रचंड फौज पाहून ताएफचे मूर्तिपूजक घाबरले. ताएफच्या प्रमुख टोळीवाल्याच्या सरदार 'अबराह'जवळ आला. त्यांना वाकून सलाम करून म्हणाला,

"हुजूर! हे ताएफ आहे. येथे आम्ही आमच्या मंदिरात पूजा–अर्चा करीत असतो. आम्ही मक्केतील 'काबा'च्या हजला जात नसतो. 'काबा' हे हजचे तीर्थ ताएफमध्ये नसून मक्केत आहे. आम्हीही मक्केचे शत्रूच आहोत. आपणास मक्केचा मार्ग आम्ही दाखवू. आपण ज्या 'काबाचा' नाश करण्यास आला आहात त्यात आमचेही सहकार्य मिळू शकेल."

अबराहने ताएफच्या प्रमुखाचे म्हणणे मान्य केले. बनी शफीकने (ताएफच्या टोळीचा प्रमुख) त्यांचा एक माणूस वाटाड्या म्हणून अबराहला दिला. तो माणूस

रस्त्यातच मृत्यूमुखी पडला. त्याला ज्या ठिकाणी पुरले त्या ठिकाणास अरब आजही तुच्छ समजतात. ताएफ व त्यांचा वाटाड्या हे परभेदे समजले जातात. अशी माणसे आजही समाजात दिसून येतात हे दुर्दैवच!

आता अबराहचे लष्कर मक्का या ठिकाणाजवळ पोहोचले. मक्केच्या जवळपास सभोवती मक्केच्या सरदारांची - कुरैशांची कुरणे होती. त्या कुरणात उंट, मेंढ्या व शेळ्या चारल्या जात. नेहमीप्रमाणे कुरैशांचे उंट, मेंढ्या व शेळ्या तेथे चरत होत्या. अबराहने कुरणात चरत असलेल्या कुरणावर हल्ला करून उंट, शेळ्या वगैरे ताब्यात घेतल्या. त्या कुरणात प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आजोबा अब्दुल मुतलिब याचेही उंटाचे, शेळ्याचे व मेंढ्याचे कळप होते. कुरणावर व प्राण्यांवर ताबा मिळविल्यावर अबराहने मक्केच्या सरदारांना निरोप पाठवून कळविले, "मी तुमच्याबरोबर युध्दास आलो नाही तर फक्त मी काबागृहाचा विध्वंस करण्यासाठी आलो आहे. जर तुम्ही माझ्याशी युध्द केले नाही, तर मीही तुमच्याशी युध्द करणार नाही. त्यामुळे तुमचे प्राण व मालमत्ता वाचेल."

वरीलप्रमाणे निरोप घेऊन अबराहचा दूत मक्केस आला. अब्दुल मुतलिब हे त्यावेळी मक्केचे प्रमुख सरदार होते. त्यांना अबराहचा निरोप सांगितला. त्यावर अब्दुल मुतलिब यांनी दूतास निरोप दिला, "आमची अबराहबरोबर लढण्याची ताकत नाही हे खरे असले तरी आम्ही स्वाभिमान सोडणार नाही. तुम्ही आमच्यावर हल्ला केल्यास आम्ही तुमच्याबरोबर प्राणपणाने लढू. तरीही आम्ही 'काबागृहाच्या' रक्षणासाठी युध्द करणार नाही. 'काबागृह' हे अल्लाहचे घर आहे. अल्लाह स्वतःच्या घराचे स्वतःच रक्षण करील असा आमचा विश्वास आहे."

त्यावर अबराहचा दूत म्हणाला, "आपण स्वतः येऊन आमच्या महाराजांची भेट घेतल्यास बरे होईल." त्यावर अब्दुल मुत्तलिब यांनी दूताजवळ अबराहची भेट घेण्यास येत असल्याचे कळविले.

ठरल्याप्रमाणे अब्दुल मुत्तलिब अबराहच्या भेटीस गेले. अब्दुल मुत्तलिब मूळचेच सुंदर होते. ते अरबी सौंदर्याचा मूर्तिमंत पुतळा होता. त्यातच त्यांच्या सौंदर्यात भर घालील असा सुंदर पोषाख त्यांनी परिधान केला होता. अबराहने त्यांना पाहताच, उठून तो पुढे आला. त्याने अब्दुल मुत्तलिब चे स्वागत केले. आणि स्वतःचे सिंहासन सोडून त्यांच्या बरोबरीने दुसऱ्या आसना वर बसला. अबराहने त्यांना

विचारले, "बोला! आपली काय इच्छा आहे?" अब्दुल मुत्तलिब त्याला म्हणाले, "तुम्ही आमचे उंट वगैरे पळविले आहेत तेवढे परत करा." त्यावर अबराह कुत्सिकपणे म्हणाला, "मी तुम्हास पाहून फार प्रभावित झालो होतो. मात्र तुम्ही माझ्यापुढे इतकी तुच्छ मागणी केली, त्यामुळे तुम्ही माझ्या मनातून सहजच उतरलात. तुम्हाला काबागृहापेक्षा तुमच्या उंटाची किंमत जास्त वाटते का?" त्यावर अब्दुल मुत्तलिब म्हणाले, "मी फक्त माझ्या उंटाचा मालक आहे. त्यांबाबतच मी आपणास विनंती करीत आहे. राहता राहिले काबागृह, ते तर अल्लाहचे घर आहे. त्याचा मालक तर प्रत्यक्ष अल्लाहच आहे. अल्लाह स्वत:च त्याच्या घराचे रक्षण करणारा आहे. ते तो करीलच."

"काय म्हणता? अल्लाह त्याच्या घरचे स्वत:च रक्षण करील?" अबराह म्हणाला.

"ते काही मला माहीत नाही. पण अल्लाह जबरदस्त आहे. त्याचे तोच जाणे!" अब्दुल मुत्तालिब म्हणाले. त्यानंतर अबराहपासून उठून ते मक्केत परतले.

त्यानंतर अबराहने त्याच्या लष्करास हल्ला करण्यासाठी तयार राहण्यास सांगितले.

मक्केस परत येऊन अब्दुल मुत्तलिब यांनी मक्कावासीयांना आपली मुले–बाळे व माल वगैरे घेऊन डोंगरात जाण्यास सांगितले जेणेकरून अबराहच्या हल्लापासून व कत्तलीपासून बचाव होईल. त्यानंतर त्यांनी, मक्केतील कुरैश सरदारांना एकत्र केले. सगळे मिळून 'काबा'गृहात गेले. तेथे सर्वांनी अल्लाहची प्रार्थना केली.

"ऐ अल्लाह! तू स्वत:च्या घराला स्वत: अबराहपासून वाचव. तसेच तुझी सेवा करणाऱ्याचेही रक्षण कर. जसे आम्ही आमच्या घराचे संरक्षण करतो, त्याप्रमाणे तू तुझ्या घराचे रक्षण कर. तू सर्वसमर्थ आहेस. तू ख्रिश्चन व आमच्यामध्ये आम्हास मदत कर. ख्रिश्चनांची चाल यशस्वी होऊ देऊ नकोस. आम्ही ज्या काबाकडे तोंड करून प्रार्थना करतो, त्या प्रार्थनास्थळाकडे दुर्लक्ष करू नकोस. अबराहपासून तू तुझ्या घराला संरक्षण दे. काबाचा शत्रू तुझाही शत्रूच आहे. तुझ्या या पवित्र शहरास तू नाशापासून वाचव."

या ठिकाणी आपल्या लक्षात एक गोष्ट आली असेलच. काबागृहात ३६० मूर्ती असूनही कुरैश सरदारांनी त्यांच्याकडे प्रार्थना करून काही मागितले नाही किंवा

त्यांना सादही घातली नाही. माणसाचे हे वैशिष्ट्य आहे की संकाटाच्या वेळी तो फक्त अल्लाहलाच साकडे घालतो. इतर मूर्तींवर त्यांच्या विश्वास नसतो. कारण अल्लाहच सर्वांत श्रेष्ठ आहे. ही त्यांची मनोमन खात्री असतेच.

मानवाचे दुसरेही एक वैशिष्ट्य आहे. मानव संकटाच्या वेळीच अल्लाहची आठवण करतो. मात्र संकट टळताच तो अल्लाहला विसरतो आणि खोट्या देवदेवतांच्या नादी लागतो. हीच अवस्था कुरैशाचीही होती. ते देवदेवतांच्या नादी लागत आणि सर्वोपरी अल्लाहपासून दूर जात. आता मात्र त्यांना अल्लाहची आठवण झाली होती. त्याच्याशिवाय आपला कोणी रक्षक नाही असे वाटत होते. म्हणून ते अल्लाहच्या दारात त्याची करूणा भाकत होते. आता त्यांना अल्लाहशिवाय कोणीच वाली दिसत नव्हता. ज्या मूर्तींचे ते गुणगाण करीत, त्यांच्याकडे आता त्यांनी संपूर्ण दुर्लक्ष केले होते. खरे पाहिले तर अल्लाहच सर्वोपरी आहे. तोच संपूर्ण मानवजातीचा रक्षणकर्ता व उध्दारकर्ता आहे. पण मानव हे विसरतो. या बाबतीत पवित्र कुरआनमधील एक उदाहरण सादर करतो.

*“आणि समुद्रात लाट छत्राप्रमाणे आच्छादित होते. तेव्हा ते अल्लाहचा धावा करतात. आपल्या धर्माला त्यासाठीच निर्भेळ करून, मग जेव्हा तो त्याना वाचवून खुष्कीपर्यंत (जमीनापर्यंत) पोहोचवतो, तेव्हा त्यांच्यापैकी कोणी मध्यम मार्ग अवलंबितो. (मूर्तीची पुन्हा आराधना करतो) आणि आमच्या संकेताचा इन्कार करतो. तो प्रत्येक मनुष्य जो विद्रोही आणि कृतघ्न आहे.”*

– सूरह लुकमान ३१:३१ ते ३२

अल्लाहची करुणा भाकून, त्याच्याशी रक्षणाकरिता दुआ मागून अब्दुल मुत्तलिब व त्यांचे सगळे सहकारी आश्रयासाठी डोंगरात निघून गेले. दुसऱ्या दिवशी अबराह मक्केवर हल्ला करण्यासाठी निघाला. परंतु अबराह याचा हत्ती सैन्याच्या आघाडीवर होता. ज्याचे नाव मुहम्मद होते. तो अचानक खाली बसला. त्याला आहुताने टोचून टोचून उठविण्याचा प्रयत्न केला पण काही उपयोग झाला नाही. मात्र अंकुशाच्या माराने तो जखमी मात्र झाला. त्याला उठणे शक्य होत नव्हते आणि तो उठलाही नाही. तो थोडाही जागेवरून हालला नाही. शेवटी मारामुळे तो उठला. त्याला माहुताने चालण्याचा इशारा केला. तर तो उत्तर, दक्षिण व पूर्वेला चालू लागे, नव्हे धावू लागे. मात्र पश्चिम दिशेकडे चालण्याचा इशारा केला तर मात्र ढिम्म! जागेवरून हलतच नसे. तो जागेवरच बसत असे. अबराहला मात्र पश्चिम दिशेला

काबागृहाकडेच जावयाचे होते. पण त्याचा इलाजच चालेना.

अबराह आणि त्याचे सहकारी हत्तीला उठविण्याच्या प्रयत्नात असतानाच आकाशात अचानक पक्षांचे थवेच्या थवे (झुंड) उडत उडत आले आणि अबराहच्या लष्करावर घिरट्या घालू लागले. त्यांच्या चोंचीत व पायात दगडाचे तुकडे होते. त्या दगडांचा आकार लहान मटारच्या दाण्याएवढा व मोठा तुकडा आक्रोड फळाएवढा मोठा होता. त्या पक्ष्यांनी त्यांच्या पायतील व चोंचीतील दगडाचा मारा अबराहच्या लष्करावर सुरु केला. त्या छोट्याशा दगडाच्या माऱ्याने अबराहच्या लष्कराची दुर्दशा झाली. दगड अंगावर पडताच त्या ठिकाणी खाज सुटत असे. खाजवण्याने कातडी सोलली जाऊ लागली. त्या जखमेतून रक्त व पूं वाहू लागे. आणि शरीरातील हाडे उघडी पडू लागली. खुद्द अबराहचीही अशीच दुर्गती झाली. त्याच्या शरिराचे तुकडे तुकडे पडू लागले.

घाबरून अबराहचे सैन्य यमनकडे पळू लागले. यमनची राजधानी तजफच्या रस्ताकडे जावे तर नेमकी दिशा समजेना, तेव्हा त्यांनी वाटाड्यास रस्ता दाखविण्यास सांगितले. तेव्हा वाटाड्या म्हणाला, "आता तुम्हाला पळून जाण्यास वावच कोठे आहे. प्रत्यक्ष अल्लाहच तुमचा पाठलाग करीत आहे."

त्या पळापळीत पुढे किंवा मागे सर्व पळत होते. परंतु त्या यमन लष्करातील कोणीही वाचले नाही. ही घटना मूजदलफा आणि मीनाच्या मध्ये घडली. त्या ठिकाणची जमीन आजूबाजूच्या प्रदेशापेक्षा जास्त खोलगट आहे. हज करणारे हाजी जेव्हा अरफातहून परत येतात तेव्हा प्रथम मूजदलफामध्ये मुक्काम करतात. मग मीना येथे येतात व नंतर तेथून मक्केस येतात. आदेशाप्रमाणे या ठिकाणाहून पळत जावे असे आहे. कारण शक्यतो लौकर तेथून जाणेच योग्य आहे. प्रेषित मुहम्मद (स.) जेव्हा अरफात पर्वताकडून आले होते. तेव्हा त्यांनीही हे ठिकाण पळतच पार केले होते, त्या ठिकाणचे नाव 'महरची दरी' असे आहे. प्रेषितांनी दरीत थांबू नये असा आदेश दिला आहे.

ही घटना इतकी उघड व ही हकिगत एवढी महत्त्वाची होती की दहा वर्षापर्यंत मक्केतील कुरैश सरदार अल्लाहची करामत विसरले नाहीत. मात्र त्यानंतर ते अल्लाहला विसरले व पुन्हा मूर्तीपूजेच्या नादी लागले.

ही हकीगत त्या वेळच्या अनेक कवींनीही आपल्या कवनातून लिहून ठेवली

आहे. या घटनेनंतर पन्नास दिवसांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांचा जन्म झाला. त्यानंतर चाळीस वर्षे पार पडली. त्याच वेळी आदरणीय मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व प्राप्त झाले. जेव्हा सुरह अल् अनफाल अल्लाहकडून वहीच्या रूपाने प्रेषितांवर अवतरली तेव्हा त्यांचे वय पंचेचाळीस वर्षांचे होते. त्यावेळी ही घटना पाहणारे जिवंत होते.

## पेटीवाले

(पेटीवाल्यांबाबतची सत्यकथा पवित्र कुरआनच्या सूरह अल बकरा या अध्यायात सविस्तर आली आहे. ही कथा आयत (श्लोक) क्रमांक २४६ पासून सुरु होऊन २५१ वर संपते.)

पेटीवाल्यांची ही सत्यकथा आजपासून जवळजवळ ३००० वर्षांपूर्वीची आहे. माननीय येशू ख्रिस्त यांच्यापूर्वी १००० वर्षे अगोदर ही कथा घडली. खरे तर ही सत्यकथा बनीइस्राईलची आहे. पण अल्लाहने त्याच्यावर विश्वास ठेवणाऱ्या सश्रध्दांना उपदेश व मार्गदर्शन म्हणून ही कथा पवित्र कुरआनात दिव्यप्रकटणाच्या रुपाने पुन्हा सांगितली आहे. त्या वेळी बनीइस्राईल हे मुस्लिमच होते. ते अल्लाहवर व आखिरतच्या (प्रलयकाळ) दिवसावर विश्वास ठेवीत असत. परंतु आज ज्याप्रमाणे पुष्कळ मुस्लिमांची अवस्था आहे, तशी अवस्था त्या वेळच्या मुस्लिमांची होती. म्हणजे अल्लाह सर्वश्रेष्ठ मानूनही ते अनेक ईश्वरांची उपासना करीत असत. आज अनेक मुस्लिमही अन्य ईश्वरांची उपासना (शिर्क) करून एकमेव अल्लाहकडे दुर्लक्ष (कुफ्र) करतात. अल्लाहला शाब्दिक मान्यता देऊनही ते अन्य धर्माच्या मताप्रमाणे उपासना करतात. ते अल्लाहच्या प्रेषिताला अल्लाहचा हुकूम चालविणारा (खलीफा) तर मानत. परंतु त्यांना खलीफाऐवजी 'बादशहा' हवा होता खरे तर! खलीफा म्हणजे अल्लाहचा प्रतिनिधी. त्याच्यापेक्षा 'बादशहा' कसा मोठा होऊ शकतो? पण बनीइस्राईलच्या मुस्लिमांना बादशहाच हवा होता. ते तशी सतत मागणीही करीत. खलीफाच्या म्हणजे अल्लाहच्या प्रेषितांनी दिलेल्या न्यायावर बादशहाने पुन्हा न्याय करावा असे स्वार्थी दृष्टीने ते म्हणत असत. त्याच्यावर बादशाही राज्याच्या विचाराचा प्रभाव होता. त्यांना खिलाफत व बादशाहतमधील फरक त्यामुळे समजत नव्हता.

त्या वेळी बनीइस्राईलचे प्रमुख माननीय सैम्युअल हे होते. ते म्हातारे झाले होते. त्या वेळी समाजातील काही श्रीमंत नेत्यांनी एक विचार उठविला की, 'आता म्हाताऱ्या माननीय सैम्युअलऐवजी कोणातरी तरुण बलवान माणसाला प्रमुख बनविले

पाहिजे आणि त्याच्या नेतृत्वाखाली माननीय सैम्युअलशी युध्द करून त्यांना खाली खेचले पाहिजे.

ज्यांना इस्लामचा इतिहास माहीत आहे त्यांना हे माहीत आहे की प्रथम बनीइस्त्राईलमधील श्रीमंत व वजनदार लोकांमध्ये हा विचार उगम पावला. हळूहळू त्यांनी त्यांच्या विचाराचा प्रचार सुरु केला. त्याचा प्रचार बनीइस्त्राईलच्या सामान्य मुस्लिमांनीही हळूहळू स्वीकारला. मुस्लिमही श्रीमंत लोकांच्या विचाराशी सहमत झाले. त्यांनी नबी माननीय सैम्युअलना एकेदिवशी सांगितले, ''आम्हास एक बादशहा द्या. बादशहाची नेमणूक करा म्हणजे आम्ही त्याच्या नेतृत्वाखाली अल्लाहच्या मार्गात युध्द करू.''

आता आपणच पाहा! एकीकडे अल्लाहच्या खलीफाऐवजी बादशहा नेमण्याची विनंती करून अल्लाहच्या व्यवस्थेमध्ये बिघाड आणण्याचा प्रयत्न करावयाचा व दुसरीकडे हे आम्ही अल्लाहच्या मार्गासाठीच त्याच्या नेतृत्वाखाली युध्द करू असे भासवावयाचे! समाजातील या वृत्तीची माननीय सॅम्युअल यांना चांगली जाण होती. ते म्हणाले,

''जर आम्ही बादशहा नेमला व धर्मासाठी तुम्हास लढण्याचा आदेश दिला तर तुम्ही लढणार नाहीत असे होईल.''

त्यावर श्रीमंतांचे प्रतिनिधी त्यांना म्हणाले,

''असे कसे शक्य होईल? तरीही ठीक आहे! आम्ही अल्लाहच्या मार्गासाठी लढणार नाही. परंतु आम्हास आमच्या घरातून हाकलून दिले आहे. आमची मुलेबाळे हिसकावून घेतली आहेत. हे आम्ही कसे विसरू?''

या बाबतीत बायबलच्या सॅम्युअल (प्रथम) च्या तपशीलाकडे लक्ष द्या. त्यात तुम्हाला बायबलने शिकवणवजा उपदेश केलेला आढळेल. त्यावरून बनीइस्त्राईलच्या लोकांच्या मनातील दुष्टावा तुम्हास पुरेपूर कळेल. बायबल (जुनाकरार) मध्ये खालीलप्रमाणे उल्लेख आहे.

''सॅम्युअल जीवनभर बनीइस्त्राईलच्या न्यायाने काम करीत राहिला. त्यानंतर बनीईस्त्राईलचे सर्व सरदार एकत्र आले आणि सॅम्युअलकडे आले व म्हणाले, ''याहा! आता तू म्हातारा झालास व थकला आहेस. आणि तुझे मुलगे बनीइस्त्राईलच्या मार्गाप्रमाणे वागत नाहीत. आता तू कोणालातरी आमचा बादशहा

नेम, तो यापुढे आमच्यासाठी न्यायालयाचे काम पाहील."

त्यांचे बोलणे सॅम्युअलला खटकले. त्याला वाईट वाटले. त्याने अल्लाहशी प्रार्थना केली. त्यावर अल्लाहने सॅम्युअलला आदेश दिला, "तुला हे लोक जे म्हणतात, त्यास मान्यता दे. कारण त्यांनी तुझा नाही, पण माझा अपमान केला आहे. याचा अर्थ असा की मी (अल्लाह) त्यांचा यापुढे बादशहा राहू नये."

मग जे लोक बादशहाची नेमणूक करण्याचा हट्ट करीत होते. त्यांना अल्लाहबरोबर झालेला सर्व संवाद ऐकविला. त्यानंतर तो म्हणाला,

"तुमच्या राज्यावर जो बादशहा होऊ इच्छिल त्याने तुमच्या मुलांना त्याच्या रथदलात व घोडदळात नोकरी दिली पाहिजे आणि तो रथाच्या व घोडदळाच्या पुढे राहील. तो हजार हजार सैनिकावर सरदार व पन्नास पन्नास सैनिकावर जमादार नेमेल. युध्दासाठी तो युध्दसामुग्री एकत्रित करून, रथाच्या निर्मितीसाठी साहित्य एकत्रित करेल. तरुणांना एकत्र करून देशात खूप अन्न धान्य पिकवील. देशामध्ये द्राक्षे आणि जैतूनच्या बागाच बागा निर्माण करेल जेणेकरून डोळ्यांना चोहोकडे हिरवेगार दिसेल. राज्यातून जो वसूल येईल त्याचा दहावा हिस्सा आपल्या सेवकात वाटून देईल. तसेच तुमच्या लोकांपैकी कामावर ज्यांना घेतले आहे, त्याचे घोडे, गाढवे वगैरेच्या चाऱ्याची सोय पाहील. तुमच्या शेळ्या–मेंढ्यांचाही तो दहावा हिस्सा घेईल. यामुळे तुम्ही सगळे त्याचे गुलाम बनाल. तो तुम्हा सर्वांच्या संपतीने श्रीमंत झालेला बादशहा आणि तुम्ही त्याचे गुलाम! ज्या दिवसापासून तुमचा बादशहा राज्य करेल आणि तुम्ही पुन्हा अल्लाहकडे न्याय मागाल त्या वेळी अल्लाह तुम्हाला कसलेही उत्तर देणार नाही."

सॅम्युअलचे सर्व म्हणणे लोकांनी ऐकून घेतले तरी ते आपला ठेका सोडावयास तयार झाले नाहीत. ते म्हणाले, "आम्हाला बादशहाच हवा. तो आमच्यावर इतर अनेक वंशातील राजाप्रमाणे आमच्यावर राज्य करील. न्याय देईल. एवढेच नव्हे तर तो आमचे नेतृत्व करेल. तसेच तो आमच्यासाठी लढायाही करील."

अल्लाहने सॅम्युअलला आदेश दिला त्याप्रमाणे त्याने एक बादशहाची नेमणूक करण्याचे ठरविले. तरीही तो पुन्हा त्या लोकांना म्हणू लागला, "जेव्हा तुम्ही पाहिले की बनी अमूनच्या बादशहाने तुमच्यावर हल्ला केला तेव्हा तुम्ही मला म्हणाला होता की जर कोणी बादशहा आमच्यावर राज्य करेल तर बरे होईल. पण तुमचा खरा

बादशहा अल्लाहच होता. आता तुम्ही ज्याच्यासाठी वारंवार विनंती करीत आहात. त्या बादशहाचेही पाहा. तुम्हीच त्याला निवडणार आहात ना! जर तुम्ही अल्लाहला भीत असता, त्याचीच आज्ञा पाळीत असता, त्याचीच आज्ञा पाळली असती, त्याच्या आदेशाचे उल्लंघन केले नसते तर अल्लाहचा हात तुमच्याविरुध्द उठला नसता. जसा तो तुमच्या वडिलांच्या व आजोबांच्या विरुध्द उठला होता. आता तुमच्या लक्षात येईल की तुम्ही अल्लाहच्या खलीफाऐवजी बादशहाला मागून फार मोठी चूक केली आहे. असो आता माझ्याबद्दल म्हणाल तर मी जीवनभर सरळमार्गाने चालूनच अल्लाहची भक्ती केली आहे. मी सरळ रस्ताच तुम्हाला सांगतो आहे. मी तुमच्यासाठी अल्लाहकडे आशीर्वादच मागणार आहे. जर तसे मी केले नाही तर मी अल्लाहचा गुन्हेगारच ठरेन.

माननीय सॅम्युअेलने ज्याचे नाव बादशहा होण्यासाठी निवडले त्याचे बायबलमधील नाव शावेल आहे आणि कुरआनतील नाव तालूत आहे. तालूत हे माननीय युसूफ यांच्या छोट्या भावाच्या खानदानापैकी होते. त्या वेळी त्यांचे वय ३० वर्षाचे होते. ते अत्यंत सुंदर तसेच चांगलेच उंच व धष्टपुष्ट तगडे होते. इतर लोक त्यांच्या खांद्याइतकेच उंच होते.

तालूत त्यांच्या वडिलांचे गाढव चुकले होते, ते शोधण्यासाठी निघाले होते. अचानक ते सॅम्युअलच्या दृष्टीस पडले. अल्लाहने सॅम्युअलना इशारा केला. हाच माणूस बनीइस्त्राईलच्या बादशहा नेमण्यास तू निवडला आहे. सॅम्युअलनी तालूत यांनाच बादशहा म्हणून निवडले.

ही घटना बनीइस्त्राईलच्या लोकांना कळताच ते म्हणाले, तालूत कसा बादशहा होऊ शकतो? त्याला आमच्यावर बादशाह होण्याचा काय हक्क आहे? त्याच्यापेक्षा बादशहा बनण्याचा आम्हाला जास्त अधिकार आहे. तो काही कोणी मालदार आसामी नाही.'' नबी सॅम्युअलनी त्यांना उत्तर दिले, ''अल्लाहने तुमच्याऐवजी त्याची निवड केली आहे. तो अतिशय बुध्दिमान आहे आणि शक्तिमान व तंदुरुस्त आहे आणि अल्लाहला अधिकार आहे की, तो ज्याला इच्छिल त्यालाच अधिकार देऊन बादशहा बनवील. अल्लाहचे सामर्थ्य फार मोठे आहे आणि सर्वकाही त्याच्याच अधिकारात आहे. त्या अल्लाहच्या अधिकारानेच त्याने तालूतची नेमणूक बादशहा पदावर केली आहे.

*"याचे चिन्ह हे आहे की तालूतच्याच अंमलात ती 'पेटी' तुम्हास परत मिळणार आहे, ज्या पेटीत तुमच्या रब (अल्लाह) कडून तुमच्या मनाला शांती मिळले असे सामग्री आहे. त्या पेटीत मूसा आणि हारून यांनी ठेवलेले व मानवाला समाधान देणारा पूज्य प्रसाद ठेवलेला आहे. या वेळी त्या पेटीचे संरक्षण देवदूत करीत आहेत. जर तुम्ही मोमीन मुसलमान असाल तर तुमच्यासाठी हे फार मोठे चिन्ह आहे."*

*—सूरह अलबकरा २:२४७ ते २४८*

एका लढाईच्या वेळी ही पेटी पॅलेस्टाईनच्या अश्रध्दावंतांच्या हाती पडली. ती त्यांनी बनीइस्त्राईलकडून हिसकावून घेतली होती. अश्रध्दावंतांनी ती पेटी ज्या ज्या शहरात व मुहल्ल्यात टेवली, तेथे भयानक आजार सुरू झाले. कडक दुष्काळ पडू लागले. शेवटी भीतीपोटी त्यांनी ती पेटी एका बैलगाडीत ठेवली. त्या बैलगाडीस गाडी हाक्या नव्हता. नंतर त्यांनी त्या बैलांना गावाबाहेर आणून हाकून दिले. गाडीवानाशिवाय ती गाडी बैलांचे तोंड फिरेल तिकडे फिरू लागली. या बाबतीत पवित्र कुरआनचे म्हणणे असे आहे,

*"त्या वेळी त्या पेटीचे संरक्षण देवदूत (फरिश्ते) करीत होते. शेवटी देवदूतांनी ती गाडी बनीईस्त्राईलमध्ये आणून सोडली."*

पुन्हा ती पेटी पॅलेस्टाईनने हिसकावून नेली त्या दिवसापासून बनीइस्त्राईलचे लोक नाराज झाले. त्यांना वाटले, 'अल्लाह आमच्यावर नाखूश आहे. त्याचा आमच्यावर रोष आहे. ते वारंवार युध्दात पराभूत होऊ लागले. एवढेच नव्हे तर त्यांची हिंमत त्यांना सोडून गेली. ते हतोत्साहित झाले. ती पेटी परत मिळणे म्हणजे अल्लाहची कृपा होणे. त्यामुळे त्यांची हिंमत परत येणार होती. त्या पेटीत त्या पाट्या होत्या ज्या अल्लाहने माननीय मूसांना उपदेशासह प्रदान केल्या होत्या. तो उपदेश माननीय मूसांनी त्या पाट्यावर लिहवून घेतला होता आणि त्यांच्या कबिल्यात ठेवला होता. ते एका बाटलीत मंत्रोच्चार करून माननीय मूसांनी ठेवले होते. त्यामुळे त्याचे रुपांतर अजगरामध्ये होत असे.

असे मोठे चिन्ह बनीइस्त्राईलकडे होते. त्यांची श्रध्दा बळकट व्हावी असा हा दाखला होता. परंतु गरीब घराण्याचा माणूस बादशहा होणे त्यांना सलत होते. आज ही अशीच स्थिती पाहण्यात येते. आजही श्रीमंत माणसे गरिबांच्या बुध्दीचा उपयोग स्वत:च्या स्वार्थासाठी करतात आणि विद्वान गरिबांना जगण्यापुरते पारिश्रमिक

(मेहनताना) देतात. जणू त्यांना गुलाम म्हणूनच राबवितात.

बनीइस्त्राईलचे लोक नव्या नेमलेल्या बादशहाबद्दल नाखूश होते. परंतु नबी सॅम्युअलच्या आदेशामुळे तालूतबद्दल नाखुशी असतानाही त्यांनी तालूतला बादशहा मानले होते. तरीही बनीइस्त्राईलचे अनेकजण तालूतच्या हुकूम मानण्यास नाखूश होते. त्याबद्दल कुरआनात पुढील उल्लेख आहे.

*"नंतर जेव्हा तालूत लष्कर घेऊन निघाला तेव्हा त्याने सांगितले, एका नदीवर अल्लाहकडून तुमची परीक्षा घेतली जाणार आहे. जो तिचे पाणी पिईल तो माझा सोबती नव्हे. माझा सोबती तर केवळ तोच आहे, जो आपली तहान त्या पाण्याने भागवणार नाही. परंतु जर एखादा ओंजळभर प्याला तर हरकत नाही. पण एका अल्पशा गटाशिवाय सर्वजण नदीत पाणी प्याले. मग जेव्हा तालूत व त्याचे मुसलमान साथीदार नदी ओलांडून पुढे निघाले, तेव्हा त्यांनी पाणी पिणाऱ्यांनी तालूतला सांगितले की आज आमच्यात जालूत व त्याच्या लष्कराशी सामना देण्याची शक्ती आमच्यात नाही. परंतु जे लोक असे समजत होते की एकेदिवशी त्यांना अल्लाहला भेटावयाचे आहे. त्यांनी सांगितले, "अनेकदा असे घडले आहे की एखाद्या लहानसा गट एका मोठ्या गटावर, अल्लाहच्या कृपेने प्रभावी ठरला आहे. अल्लाह सहनशील लोकांचा सहाय्यक आहे. आणि जेव्हा ते जालूतच्या लष्कराशी सामना करण्यास निघाले, तेव्हा त्यांनी प्रार्थना केली. हे पालनकर्त्या आमच्यावर सहनशीलतेचा वर्षाव कर. आमचे पाय स्थिर कर आणि त्या अश्रध्दावंतांवर आम्हास विजयी कर."*

*—सूरह अलबकरा २ :२४९ ते २५०*

वरील प्रार्थना करणारे जे होते, त्यांनी त्यांचा बादशहा तालूत याच्या आज्ञेप्रमाणे त्या नदीचे पाणी प्राशन केले नव्हते वा एखादी ओंजळ भर प्याले होते. त्यांच्यापैकी एक तरुण होता दाऊद, त्याने पुढे होऊन जालूतची कत्तल केली आणि त्या छोट्याशा लष्कराने जालूतच्या मोठ्या लष्करावर मोठ्या उत्साहाने हल्ला केला. जालूतचे लष्कर पळून गेले.

तालूत दाऊदवर फार खूश झाला. त्याने स्वत:चीं मुलगी दाऊदला देऊन त्यास जावई करून घेतले. हाच तरुण पुढे बनीइस्त्राईलचा बादशहा झाला. आणि अल्लाहने त्याला नबी म्हणजे प्रेषितत्व प्रदान केले. तसेच माननीय सुलेमानसारखा पवित्र प्रेषित त्यांच्या उदरी जन्मास घातला. अल्लाहने दाऊदच्या घराण्यास महतत्वाचे

बादशहा पद दिले. तसेच त्यांना हवे असेल ते देऊन त्या खानदानास कृपा छत्र देऊन त्याचे महत्त्व वाढविले.

*"दाऊदने जालूतला ठार केले. आणि अल्लाहने त्याला राज्य व विवेकाने उपकृत केले. ज्या ज्या गोष्टी अल्लाहने इच्छिल्या त्या त्यास दिल्या. त्याचे ज्ञान त्यास दिले. जर अल्लाह अशा प्रकारे मानवाच्या एका समुदायाला दुसऱ्या समुदायाच्या हस्ते हटवित नसता तर, पृथ्वीची व्यवस्था बिघडली असती. परंतु या जगातील लोकांवर अल्लाहची मोठी कृपा आहे. (अशा रीतिने तो (अल्लाह) हिंसाचाराच्या विनाशाची व्यवस्था करीत असतो.)"*

*—सूरह अल बकरा २:२५१*

पेटीवाल्याची ही कथा आपण लक्षात घेतली तर आजही आपणास निराश होण्याचे कारण नाही असे वाटेल. मात्र एक अट नक्की आहे. अल्लाहने आपणास घालून दिलेल्या अटीप्रमाणे (नियमाप्रमाणे) आपण वागले पाहिजे व अल्लाहवर विश्वास ठेवावयास हवा.

## सबाची महाराणी

'सबा' ही दक्षिण अरबस्थानातील एक मोठी जमात आहे. येशू ख्रिस्तांच्या अगोदर अडीच हजार वर्ष या जमातीचा इतिहासात उल्लेख आढळतो. ही जमात शेतीवाडी करीत असे. शेती हाच त्यांचा प्रमुख उद्योग होता. त्याचबरोबर ते व्यापारही करीत असत. या दोन कारणामुळे 'सबा'ची प्रगती होत गेली. शेतीसाठी आवश्यक पाण्याची व्यवस्था त्यांनी उत्तम प्रकारे केली होती. तशी व्यवस्था जगात त्या वेळी दुर्मिळच होती. यमनमध्ये नैसर्गिकरित्या काही नद्या वाहत होत्या. आजही त्या तशा वाहतच आहेत. त्यांनी पावसाळ्यात डोंगरावरून वाहत येणारे छोटे छोटे ओहोळ व ओढे अडवले. ठिकठिकाणी छोटे छोटे तलाव बांधले. त्यातील पाणी कालव्याद्वारे ते शेतीस देत असत. त्याचा उपयोग पूर्ण यमनला होत असे. त्यामुळे तो प्रदेश नेहमी हिरवागार दिसत असे. चोहोकडे बागाच बागा नजरेस पडत असत. त्याचे वर्णन पवित्र कुरआनातही आले आहे.

*'सबा'करिता खुद्द त्यांच्या निवासस्थानातच एक संकेत उपस्थित केला आहे. दोन उद्याने उजव्या व डाव्या बाजूस. खा आपल्या पालनकर्त्याने दिलेली उपजीविका आणि कृतज्ञ बनून राहा त्याचे (अल्लाहचे) प्रदेश आहे उत्कृष्ट आणि स्वच्छ आणि*

पालनकर्ता आहे क्षमाशील." —सूरह अल्सबा ३४:१५

याचा अर्थ असा की सबाची सर्व जमीन बागांनी फुलली होती. सबामध्ये मनुष्य कोठेही उभा राहिला तर त्याच्या समोर, मागे, उजवी व डावीकडे त्याला बागाच बागा नजरेस पडत. त्या बागा विविध प्रकारच्या फळांच्या होत्या. त्यांच्या झाडावर विविध प्रकारची फळे नेहमीच लदलेली असत. तसेच विविध प्रकारच्या फुलांचा सुगंध नेहमी वातावरणात दरवळत असे. फळे व फुले तेथे विपुल प्रमाणात पिकत असत. सबाचे नागरिक त्याचा मनसोक्त उपभोग घेत असत. त्यानंतरही मोठ्या प्रमाणावर फळे, फुले, अन्नधान्य वगैरे उरत असे. उरलेला माल त्यांनी निर्यात करावयाचे ठरविले. त्यामुळे त्यांचे लक्ष व्यापाराकडे गेले. याप्रमाणे सबाच्या व्यापाराचा पाया घातला गेला.

व्यापारासाठी या लोकांना अल्लाहने छान सोय करून दिली. तुम्ही जर नकाशाकडे दृष्टी टाकली तर तुमच्या लक्षात येईल की यमन हे जगाच्या चौकात म्हणजे हमरस्त्यावर असलेले दिसेल. त्याचा फायदा 'सबा' या जमातीने फार मोठ्या प्रमाणावर घेतला. यमनच्या समुद्र किनाऱ्यावर त्यांनी अनेक बंदरे बांधली. त्यामुळे नौकानयनास व त्यामुळे व्यापारास सोपे गेले. हजार वर्षे या जमातीने समुद्रावर वर्चस्व गाजविले व पूर्व पश्चिम देशाचा व्यापार आपल्या नियंत्रणात ठेवला. चीनचे रेशीम व मलबारच्या मसाल्याचा व्यापार याच लोकांच्या नियंत्रणात होता. भारतातील कापडाची मागणी पश्चिमेत भरपूर होती त्याचाही हे व्यापार करीत. मालाची ने–आणही करीत. भारतीय शस्त्रेही ते पश्चिमेकडील देशांना पुरवीत. या बंदरातून वरील सर्व वस्तू इजिप्त, इराक व आफ्रिकेतील देशांना ते पुरवित. आफ्रिकन गुलाम, शहामृग इत्यादींचाही ते व्यापार करीत. त्यांचा माल रोमपर्यंतही जात असे.

सबा जमातीने त्यांच्या व्यापाराच्या उद्योगाचे रक्षण व्हावे म्हणून फार मोठी संरक्षण व्यवस्था अंमलात आणली होती. जलमार्गावर व खुष्की (जमीनीवरील) मार्गावर त्यांनी कडेकोट संरक्षणाची व्यवस्था केली होती. त्यासाठी त्यांनी समुद्रात व जमिनीवर संचार करणारी फिरती पथके नेमली होती. तसेच ठिकठिकाणी गड कोर बांधून स्थायी चौक्या निर्माण केल्या होत्या. त्याच्या खुणा आजही व्यापारी मार्गावर यमनमध्ये जागोजागी दिसतात.

याच प्रदेशात 'सबा' जमातीमध्ये राजघराण्यात या मुलीचा जन्म झाला. ती

मुलगीच पुढे सबाची राणी बनली. इतिहासात तिचे नाव 'बिल्किस' असे नोंदले आहे. परंतु इस्लामी इतिहासात 'बिल्किस' या नावाची सनद कोठेही सापडली नाही असे म्हटले आहे. इस्लामी इतिहासात मात्र ती 'सबाची महाराणी' याच नावाने प्रसिध्द आहे. कदाचित ते तिचे 'टोपण नाव' (लकब) असावे.

अल्लाहने या 'सबाला' बौध्दिक व शारीरिक सौंदर्य प्रदान केले होते. त्याचबरोबर ती मृदूभाषी व मनाने उदार आणि समजूतदार होती. दुसरीकडे तिची जमात जगभर व्यापार करून प्रसिध्दिस आली होती. त्याचप्रमाणे महाराणीने तिच्या शौर्याने व युध्दकौशल्याने सर्वांवर धाक बसविला होता. तिच्या जमातीतील मोठमोठे योध्देही तिच्या पराक्रमापुढे व बौध्दिक शहाणपणापुढे नतमस्तक होत असत. तिच्या तलवारबाजीने म्हणजे तलवार चालविण्याच्या कौशल्याने प्रभावित होत. तिच्या राज्य करण्याच्या कौशल्यामुळेही ती सर्वांना प्रिय झाली होती. सर्व राजकारणी व शूर योध्दे तिची आज्ञा पाळण्यास तत्पर असत.

महाराणी सबाने स्वत:साठी एक अत्यंत मौल्यवान, सुंदर व रत्नजडित सिंहासन बनविले होते असे म्हणतात की असे मौल्यवान व सुंदर सिंहासन त्या वेळच्या कोणत्याही राजाकडे उपलब्ध नव्हते. तिची राजधानी 'माब' या शहरात होती. ती यमनची राजधानी 'सना'पासून ५५ मैल ईशान्येस होती.

महाराणी सबा आणि तिची प्रजा जेव्हा यशाच्या उच्च शिखरावर होती तेव्हा अल्लाहने माननीय दाऊद यांचे पुत्र माननीय सुलेमान यांना प्रेषित्व बहाल केले. प्रेषित्वाबरोबरच त्यांना राज्यही दिले. ते पाहून महाराणी सबा आश्चर्याने दंग झाली. अल्लाहने जिन्न (पवित्र योनि) पशू व पक्षी यांच्यावर माननीय सुलेमान यांना ताबा दिला म्हणजे जिन्न, पशू व पक्षी हे माननीय सुलेमानच्या शब्दाप्रमाणे हुकूमाप्रमाणे वर्तन करीत. त्यांच्यासाठी हवासुध्दा थांबविली गेली होती. माननीय सुलेमानचे सिंहासन हवेवर अधांतरी तरंगत राहत असे. ते हवेमध्ये उडत जात असे. जिन्न त्यांच्यासाठी मोठमोठे महाल (राजवाडे) क्षणात बनवून सादर करीत. त्यांच्या भटारखान्यासाठी मोठमोठी भांडी वगैरेही ते पुरवीत. महालासमोर मोठमोठे हौद व बागा तयार करीत. ते माननीय सुलेमानसाठी सर्व सुखाची साधने पुरवित. त्यांच्या महालामधील जमीन गुळगुळीत काचेसारखी स्फटिकाची बनविली होती. नबी सुलेमान हे अल्लाहची देणगी रयतेत वाटून टाकीत. ते सामान्य रयतेप्रमाणे साधे राहत. सामान्यप्रमाणे भोजन घेत. माननीय सुलेमानना प्रत्येक क्षणाला जबाबदारीची जाणीव असे. कृतज्ञता, संयम व

जबाबदारीची जाणीव त्यांच्या श्वासागणित त्यांना होत असे. ते जाणिवेच्या तंद्रीतच असत. ते नेहमी अल्लाहच्या गुणगाणात प्रार्थनेत नेहमी मग्न असत.

त्यांना एकेदिवशी बातमी कळली की सबा नावाच्या जमातीवर महाराणी सबा ही स्त्री राज्य करीत आहे. अल्लाहकडून तिला सर्व प्रकारची मदत होत असते. तिचे सिंहासन हिरेजडित असून ते अत्यंत सुंदर आहे. परंतु तिला जन्माला घालणाऱ्या अल्लाहला ती मानीत नाही. ओळखीत नाही. ती स्वत: सूर्यपूजक आहे. तिची प्रजाही तिच्याप्रमाणेच सूर्यासमोर नतमस्तक होते. थोडक्यात सबाची जमात सूर्यपूजक होती. सैतानाने त्यांचे वर्तन चांगले आहे, सूर्यपूजा योग्य आहे, असे त्यांच्या मनात ठसविले आहे. ती तिच्या श्रध्देवर तृप्त आहे, समाधानी आहे. तिला सैतानाने अल्लाहच्या मार्गाने जाण्यास अडथळा आणला आहे. त्यामुळे तिला सरळ मार्ग दिसत नाही. जर त्यांच्या लक्षात आले की आकाशात व जमिनीवर त्याचा मालक व पालनकर्ता अल्लाहच आहे. तसे जर झाले तर खात्रीने ते सर्व अल्लाहलाच सजदा समप्रित करतील.

पवित्र कुरआनमध्ये ज्या प्रभावी पध्दतीने महाराणी सबाच्या मुसलमान होण्याची सत्य कथा आली आहे, ती खरोखरच उपदेशप्रद आहे. ते अत्यंत वास्तविक तत्त्व प्रतिपादन आहे. ते आम्हासही अतिशय लाभप्रद ही आहे. तो वृत्तांत वाचून आम्ही किती कमी प्रमाणात अल्लाहच्या मार्गाने चालतो हे कळून आम्हास दु:ख वाटेल. यासाठी आम्ही पवित्र कुरआन समोर ठेवून त्याप्रमाणे अल्लाहने आम्हास बुध्दी द्यावी अशी अल्लाहला आम्ही प्रार्थना करतो.

माननीय सुलेमान यांना महाराणी सबाबद्दल जेव्हा कळले तेव्हा त्यांना महाराणी सबा हीस इस्लामचे आमंत्रण द्यावे असे तीव्रतेने वाटू लागले. त्यासाठी ते बेचैन झाले. अल्लाहचा संदेश प्रभावीपणे महाराणी सबाला कोणत्या प्रकारे देता येईल याचा ते सारखा विचार करू लागले. ते त्याच्या नियंत्रणाखालील जिन्न, पशू व पक्षी यांना घेऊन सबावर आक्रमण करू शकत होते. या प्रकारे ते जबरदस्तीने तिला त्यांच्या समोर गुडघे टेकवण्यास लावू शकत होते. परंतु त्यांनी तसे केले नाही. कारण महाराणी सबा व त्याचे लष्कर यांच्या मनाचा वेध घेण्याचे त्यांनी ठरविले होते. ते अल्लाहवर व त्याच्या नबीवर विश्वास ठेवतील असा व्यूह त्यांनी रचला.

माननीय सुलेमाननी एक पत्र ज्यामध्ये इस्लाम स्वीकारण्याचे आमंत्रण होते, ते

पत्र महाराणी सबाला पाठवण्याचे ठरविले. ते पत्र कसे पाठवावे? याचा ते विचार करू लागले. त्यांनी जे पत्र लिहिले. ते आजही जसेच्या तसे सुरक्षित आहे. त्यांनी ते पत्र इतके छोटे व प्रभावी भाषेत लिहले होते की तसे पत्र आजपर्यंत जगात कोणीही कोणाला लिहिले नसेल. माननीय सुलेमान जाणून होते की महाराणी सबा ही अत्यंत बुध्दिमान व स्वाभिमानी आहे. तिला पत्र लिहितांना विचार करणे जरूर होते. तिला पत्र लहान असणेच योग्य होते. कारण तिच्या कामाच्या धबडग्यात लांबलचक पत्र वाचण्यास भरपूर वेळ मिळणे दुरापास्त होते. म्हणून कमी शब्दात त्यांची इच्छा स्पष्ट करणारे लहानसे पत्र आवश्यक होते. म्हणून माननीय सुलेमाननी अत्यंत छोटे पण प्रभावी पत्र लिहिले. ते लिहलेले इस्लाम स्वीकारण्याचे आमंत्रण पत्र नेमके महाराणी सबाच्या हातातच पण फावल्या वेळात पडणे जरुर होते. एखाद्या जासूदामार्फत असे पत्र पाठविणे योग्य व खात्रीचे नव्हते. म्हणून त्यांनी एक वेगळाच मार्ग निवडला. त्यांनी ते पत्र त्यांच्या नियंत्रणाखालील पक्ष्यामार्फत पाठवण्याचे ठरविले. त्यांनी ते पत्र हुदहुद (सुतारपक्षी) पक्ष्याच्या हवाली योग्य सूचना देऊन केले.

महाराणी सबा ही सूर्यउपासक होती. ती तिची कामे आटोपून सूर्यदर्शनास निघाली होती. नेमकी ती वेळ साधून हुदहुद पक्ष्याने ते पत्र महाराणी सबासमोर टाकले. ते पत्र पाहताच महाराणी सबाने ते हातात घेतले. नेहमीच्या मार्गाने पत्र येण्याऐवजी ते अचानक व अनोख्या पध्दतीने मिळालेले पत्र पाहून ती अचंबित झाली. तिने ते पत्र वाचले आम्ही आपणास मागेच सांगितले आहे की महाराणी सबा ही बुध्दिमान व समजूतदार होती, तरीही ती ते पत्र वाचून भांबावली. तिने अनेक वेळा ते पत्र वाचले. प्रत्येक वाचनाच्या वेळी 'अल्लाह' हा शब्द तिच्या पुढे नाचू लागला. अल्लाहचा संदेश आमंत्रण जणू तिला बोलावू लागले. ते पत्र तिने आपल्या जवळच ठेवले. कारण ते पत्र तिच्या जीवनात प्रकाश आणणारे आहे असे तिला वाटले. ती सूर्योपासनेस जाण्याऐवजी अर्ध्या वाटेतूनच परत फिरली. सोबतची माणसे ते पाहून आश्चर्यचकित झाली. महाराणी सबाने दरबार भरविण्याची आज्ञा दिली.

दरबार भरला महाराणी सबा तिच्या प्रसिध्द सिंहासनावर विराज मान झाली. तिने माननीय सुलेमानचे पत्र सर्व दरबारी लोकांना वाचून दाखविले.

ते पत्र खालीलप्रमाणे होते.

''हे पत्र सुलेमान यांच्याकडून आणि दयावंत व कृपावंत अल्लाहच्या नावाने,

सुरु केले जात आहे. मजकूर हा आहे की माझ्याविरुध्द संघर्षास उभी राहू नकोस. वरचढपणा करू नकोस. इस्लाम स्वीकारून माझ्या दरबारात हजर हो.''

माननीय सुलेमानचे पत्र दरबारात वाचून दाखवून ती म्हणाली, ''असे हे पत्र सुलेमान यांनी मला एका हुदहुद पक्ष्यामार्फत पाठविले आहे.''

''हे माझ्या सरदारांनो! मी तुमच्या वर्तणुकीबद्दल पूर्णपणे जाणत आहे. माननीय सुलेमान आमच्याकडे शिष्टमंडळ पाठवून आमच्याशी चर्चा करू शकत होते. पण त्यांनी तसे केले नाही. शिष्टमंडळामार्फत ते आमच्यावर अटी लादू शकत होते. पण त्यांनी तसे का केले नाही? फक्त एक साधेसे पत्र लिहिले आहे आणि आम्हाला आमंत्रण पत्र लिहून त्यावर विचार करण्यास सांगितले आहे.

''हे माझ्या जमातीच्या सरदारांनो! हे पत्र त्यांनी पॅलेस्टाईन अथवा इराकच्या राजांना लिहावे तसे आम्हालाही लिहिले असावे असे मला वाटते. अशा बलाढ्य राष्ट्रानाही ते इस्लामचे आमंत्रण देतात. तसेच आम्हाला देण्यात, त्यांचा हेतु युध्द करणे अथवा आमची मालमत्ता वा राष्ट्र गिळंकृत करणे हा निश्चितच नसावा. अल्लाहने तिकडे सुलेमान यांना राज्य देऊन त्यांना प्रेषित्वही दिले आहे. त्यांनी आम्हाला अल्लाहकडे येण्याचे आमंत्रण दिले आहे. आज जगात हीच पध्दत वापरली जात आहे. कोणी देवतांच्या नावावर पत्र लिहून धर्म स्वीकारण्याचे आमंत्रण देतात. त्याप्रमाणे सुलेमाननी आम्हास इस्लामचे आमंत्रण दिले आहे. आम्ही सर्व ईश्वरांना सोडून माननीय सुलेमानच्या अल्लाहला जो दयावंत व कृपाळू आहे, त्याचा धर्म स्वीकारावा. माननीय सुलेमानचे हे पत्र त्यांच्या मनाच्या औदार्याचेच प्रतीक आहे. त्यांच्या मते आम्ही अल्लाहचा धर्म स्वीकारावा असेच आणि एवढेच आहे.

''हे माझ्या सबाच्या सरदारांनो! तुम्ही साक्ष आहात की मी जगातील कोठल्याच मोठ्या बादशहाला भ्याले नाही. आपण जगातील जबरदस्त बादशहाशी टक्कर घेतली आहे. मी तुमच्यामध्ये राहून माझी तलवार शत्रूवर चालविली आहे. तुम्ही माझे पाऊल कधीही मागे फिरले नाही हे पाहिले आहे. जर सुलेमान यांनी फौजेची भीती दाखवून आम्हास युध्दाचे आव्हान दिले तरी आम्ही भ्यालो नसतो, हे तुम्हास चांगलेच माहीत आहे. परंतु असे वाटते की ते अल्लाहचे प्रेषित आहेत आता तुम्ही मला या प्रकरणी सल्ला द्या. तुम्हास हे माहीत आहे की मी प्रत्येक निर्णय तुमच्या सल्ल्याने घेत असते.'' एवढे बोलून महाराणी सबा स्तब्ध बसली.

त्यावर तिच्या सरदारांनी एकमत होऊन तिला सांगितले, "आम्हास तुमच्या सद्सद् विवेकावर व बुध्दिमत्तेवर पूर्ण विश्वास आहे. तुम्ही जो निर्णय घ्याल, तो आम्हास मंजूर आहे. जर तुम्ही सुलेमानशी लढू इच्छित असाल तर आम्हीही काही कमी नाही. लढणे ही आम्ही जाणतो. ताकत तर आमच्या जवळही आहे. निर्णय तुमच्या हातात आहे. तुमचा निर्णय आम्ही कसा अंमल आणतो ते तुम्ही पाहालच!"

दरबारातील सरदारांची तिच्याप्रति निष्ठा, विश्वास व प्राणपणाला लावण्याची जिद्द पाहून महाराणी सबा मनोमन संतुष्ट झाली.

एखादा बादशहा जेव्हा दुसऱ्या देशावर आक्रमण करतात तेव्हा त्या देशाचा विध्वंस करून तेथील सन्माननीय नागरिकांना अपमानास्पद वागणूक देतात. परकीय आक्रमण त्या देशाच्या कल्याणासाठी कधीच नसते. परंतु माननीय सुलेमान तसे दिसत नाहीत. ते अचानक लष्कर घेऊन सबावर तुटून पडले असते जेव्हा एखादा सम्राट दुसऱ्या देशावर आक्रमण करतो तेव्हा त्या राज्यातील मोठ मोठ्या लोकांची व नागरिकांची कत्तल करतात. स्त्रियांची विटंबना करून त्यांना गुलाम करतात. परंतु माननीय सुलेमाननी तसे आक्रमण केले नाही. अथवा अचानकपणे आमच्यावर आक्रमण करू इच्छित नाही असे वाटते. तो सर्वसाधारण आक्रमकाप्रमाणे आमचे धन धान्य, सोने–नाणे वगैरे हिसकावून घेऊ इच्छित नाही. त्यांची प्रदेश गिळंकृत करावयाचीही इच्छा दिसत नाही. उलट ते म्हणतात, "अल्लाहची भक्ती करा. इस्लाम कबूल करा आणि माझा हुकूम मान्य करा." त्याच्या पत्रातील 'माझी' हा शब्द मात्र मला खटकत आहे. तो 'माझी' या शब्दाचा अर्थ 'सुलेमानची' असा करत असेल तर ते मला मान्य नाही. उलट ईश्वरी 'आदेशाचे पालन करा' असा अर्थ घेत असल्यास त्याला मी विरोध करणार नाही. 'माझी' या शब्दांचा अर्थ 'सुलेमानची' असा असेल तर मला निराळाच निर्णय घ्यावा लागेल. मी तो खरोखर प्रेषित आहे की फक्त बादशहा आहे. याची परीक्षा करू इच्छिते मी एक दूत नजराण्यासह माननीय सुलेमानकडे पाठविते. मग पाहते की माझा दूत काय खबर आणतो.

महाराणी सबाने ठरविल्याप्रमाणे तिचा एक हुषार दूत माननीय सुलेमानकडे पाठविला. हा दूत तिच्या दरबारातील हुषार सरदार होता. तो दूत माननीय सुलेमानच्या दरबारात हजर झाला. त्याने "मी यमन देशातून महाराणी सबाकडून आलो आहे. त्यांनी हुजूरचरणी हा नजराणा पाठविला आहे." असे म्हणून त्याने आणलेला नजराणा सुलेमानसमोर ठेवला. नजराण्यावरील आच्छादन दूर केले तेव्हा सर्व दरबारी

लोकांना अत्यंत आनंद झाला.

मात्र माननीय सुलेमानच्या चेहऱ्यावरील सुरकुतीही हलली नाही. माननीय सुलेमानऐवजी दुसरा कुणी सामान्य बादशहा असता तर तो नजराणा आनंदाने स्वीकारला असता. ते शांतपणे म्हणाले, ''आम्हास अल्लाहने यापेक्षा मूल्यवान देणग्या दिल्या आहेत. महाराणी सबांचा हा नजराणा मी स्वीकारू इच्छित नाही.'' असे म्हणून त्यांनी तो मूल्यवान नजराणा परत केला.

महाराणी सबाचा दूत परत आला त्याने माननीय सुलेमानचा निरोप महाराणीस सांगितला. त्याने माननीय सुलेमानची स्तुती करून म्हटले.

''हुजूर! माननीय सुलेमान अत्यंत निस्पृह असून अल्लाहचे खरे दूत आहेत असे मला वाटते. ते अत्यंत प्रामाणिक व शुध्द आचरणाचे तर आहेतच. पण क्षणाक्षणाला अल्लाहची आठवण स्मरण करताना त्यांची मान अल्लाहसमोर नतमस्तक होते.''

दूताचे वरील वचन ऐकून महाराणी सबा अत्यानंदित झाली. ती म्हणाली, ''माझा अंदाजच खरा ठरला. ते खरोखरच प्रेषित आहेत. परंतु त्यांनी 'माझ्या'समोर हजर व्हा. या त्याच्या म्हणण्याने मी संशयात पडले आहे. खरोखरच ते नबी आहेत का? व अल्लाहचे एकनिष्ठ भक्त आहेत का? की अल्लाहच्या नावा आड स्वत:चे प्रस्थ वाढविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. हे प्रत्यक्ष जाऊन पाहणेच योग्य होईल. असे महाराणी सबाला वाटले.

तिच्या मनात माननीय सुलेमानशी प्रत्यक्ष भेटण्याचा विचार येताच तिने आपले लष्कर सज्ज केले. लष्करासाठी आवश्यक ती सामुग्री गोळा केली. तिने माननीय सुलेमानच्या भेटीसाठी कूच केले.

''अल्लाह त्याच्या भक्तांना बौध्दिक देणगीबरोबरच अधिकार व सत्ताही देतो.''

माननीय सुलेमान यांना महाराणी सबा त्यांच्या भेटीस येत आहे हे कळले. त्या वेळी त्यांनी तिला चकित करावयाचे ठरविले. त्यांनी 'जिन्न'ला आज्ञा केली आणि महाराणी सबाचे यमनमधील सिंहासन त्वरित उचलून आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांच्या आज्ञांकित 'जिन्न'ने महाराणी सबाचे सिंहासन ताबडतोब माननीय सुलेमानच्या दरबारात हजर केले. त्यानंतर माननीय सुलेमाननी दरबारात अल्लाहचे आभार मानले. ते म्हणाले,

“हे अल्लाह ही सर्व ताकत तुझीच आहे. मी केवळ तुझाच बंदा आहे. ही शक्ती मला देऊन अल्लाहने माझी परीक्षाच पाहिली आहे, मी अल्लाहच्या ठायी कृतघ्न की कृतज्ञ आहे. हे त्याने सिंहासन आणवून दिले आहे. जो अल्लाहशी कृतज्ञ असतो व चांगली कर्मे करतो. त्यासच अल्लाह विविध शक्ती प्रदान करतो. अल्लाह चांगल्याचे अमर्याद कल्याण करतो.”

त्यानंतर माननीय सुलेमाननी आपल्या सेवकास आज्ञा दिली,

“महाराणी सबा दरबारात आल्यानंतर अचानक तिचे सिंहासन तिच्यासमोर ठेवा. पाहू या ती स्वत:चे सिंहासन ओळखते का? यावरून तिच्या बुध्दिमत्तेची व प्रामाणिक वर्तनाची आम्हास ओळखही होईल.’

रीतसर महाराणी सबाने दरबारात प्रवेश केला. तेव्हा तिच्यासमोर तिला ते सिंहासन दिसले. तिने तात्काळ ओळखले. तिला माननीय सुलेमान म्हणाले, “तुमचे सिंहासन असेच आहे का?”

तिने पुन्हा एकदा सिंहासनाकडे नजर टाकली व ती म्हणाली, “होय ते असेच आहे. मी तर सिंहासन पाहण्यापूर्वीच, तुम्ही नबी असल्याचे ओळखले होते.”

माननीय सुलेमान तिला घेऊन स्वत:च्या महालाकडे गेले. सुंदर व स्वच्छतेने परिपूर्ण असा महाल पाहून ती आश्चर्यचकित झाली. तिने समोर पाहिले तेव्हा तेथे तिला पाण्याचा हौद दिसला. आता पाण्यातून पलीकडे जाणे क्रमप्राप्त होते म्हणून तिने स्वत:ची पायाजवळील वस्त्रे भिजू नयेत म्हणून थोडी वर उचलली. तेव्हा माननीय सुलेमान यांनी तिला सांगितले,

“इथे पाणी नाही तर स्फटिकाची फरशी आहे. तुम्हाला ते पाणी आहे असे वाटले. हा नुसता दृष्टी भ्रम आहे.”

यमनमधील सिंहासन अचानक दरबारात पाहून व माननीय सुलेमानच्या महालाची अद्वितीय बांधणी पाहून तिची माननीय सुलेमान हे ‘नबी’ असल्याची खात्री पटली. माननीय सुलेमानना ही ताकत अल्लाहनेच प्रदान केली आहे.

माननीय सुलेमान यांची जिन्न, पशू व पक्षी यांच्यावर असलेली हुकमत आणि त्यांचा मानवी आकलनापलीकडे असलेले अमानवी सौंदर्य याचा विचार तिच्या मनात घोळत होता. ती माननीय सुलेमानचे वैभव व त्यांची साधी राहणी व

अल्लाहवरील एकनिष्ठ भक्ती याने भारावून गेली. ती अचानक म्हणाली,

"मी माननीय सुलेमान यांच्या समवेत अल्लाहचे श्रेष्ठत्व मान्य करते. मी अल्लाहच्या धर्मावर श्रध्दा ठेवते."

वरील उद्‌गार ऐकून माननीय सुलेमान फार खूश झाले. महाराणी सबाने इस्लामचा स्वीकार करणे ही अत्यंत आनंदाची घटना होती.

माननीय सुलेमान यांनी महाराणी सबाच्या मुस्लिम धर्मावर श्रध्दा ठेवल्याचे व इस्लाम स्वीकारल्याचे दरबारात जाहीर केले. त्यानंतर तिला यमनकडे जाण्यासाठी निरोप दिला.

महाराणी सबा इस्लामची श्रध्दा धारण करून यमनमध्ये आली. तिने आपल्या प्रजेस इस्लाम स्वीकारण्याचे आवाहन केले. थोड्याच अवधीत सर्व यमनमध्ये इस्लाम धर्माचा प्रसार झाला.

"ही सर्व अल्लाहचीच कृपा आहे. तो ज्याला जे हवे ते प्रदान करतो."

## मृत समुद्र

आपण जर जगाचा नकाशा पाहिला तर आपणास 'मृत समुद्र' नामक छोटा समुद्र असल्याचे दिसेल. या मृत समुद्रास पर्शियनमध्ये 'बहरे मुरदाड' तर इंग्रजी मध्ये 'डेड सी' म्हटले जाते. अरबी मध्ये यास 'बहरे लूत' असे नांव आहे. तो 'अल कर्क' शहराच्या उत्तेरस पसरलेला आहे. हा समुद्र तसा फार मोठा नाही पण त्याच्या काही खास वैशिष्ट्यामुळे तो जगप्रसिध्द आहे. भूगोलाचे अभ्यासक त्याचा आश्चर्याने आणि मन:पूर्वक अभ्यास करताना आढळतात.

या मृत समुद्राचे पाणी विषारी आहे. त्याच्या पाण्याचा रंग काळा आहे. या समुद्रात कोणताही सजीवांचा आढळ नाही. एवढेच नव्हे तर त्यात मासेसुध्दा नाहीत. किंवा मगरीसारखे प्राणीही नाहीत. म्हणून त्यास 'बहरे मुरदाड' किंवा मृत सागर म्हटले जाते. भौगोलिक तज्ञाचे असे म्हणणे आहे की या मृत सागराच्या ठिकाणी पूर्वी पेट्रोल, अस्फाल्ट आणि विषारी वायू तेथील खड्ड्यातून अस्तित्वात होते. तसे काही खड्ड्यात अग्नीही अस्तित्वात होता. शास्त्रज्ञांचे म्हणणे असे की पाच हजार वर्षांपूर्वी तेथे मृत समुद्र अस्तित्वात नव्हता. मग हा समुद्र अचानक अस्तित्वात कसा आला? भूगोल तज्ञांच्या मते पाच हजार वर्षांपूर्वी तेथे एक फार मोठा भूकंप झाला.

तेथे मोठी उलाढाल झाली. भूकंपाने जमिनीला एक फार मोठा खड्डा पडला आणि त्या उलथापालथीने मृत समुद्र अस्तित्वात आला. चोहोकडे पाणी पसरले तेथील मूळच्या अग्नी, पेट्रोल व अस्फाल्टमुळे पाणी उकळू लागले.

हा समुद्र तसा खोल नाही. तो उथळच आहे. परंतु त्यात विषारी वायू वगैरे मिसळल्यामुळे ते पाणी विषारी झाले आहे. त्याच्या विषारीपणामुळे कोणीही मानव व सजीव त्यात प्रवेश करू धजत नाही. त्याच्या विषारी पाण्यामुळे व त्यातून निघणाऱ्या विषारी हवेमुळे कोणी आसपासही फिरकत नाहीत. त्यामुळे मृत समुद्राच्या भोवतालचा भाग उजाड झाला आहे. तेथील दृष्यच मोठे भयानक आहे. त्यामुळे त्याच्या जवळूनसुध्दा कोणीही प्रवास करीत नाहीत. तेथे एका विशिष्ट प्रकारच्या विषारी माशा आढळतात. त्यांचा चावा इतका भयानक असतो की तिच्या चाव्यामुळे शरीरांत भयंकर आग पडते. प्रसंगी माणसाचा मृत्यूही होतो. मृत समुद्राच्या आसपास दूरपर्यंत मानवाची वस्ती नाही. तसेच शेतीही होऊ शकत नाही. 'अलकर्क' शहराजवळील एखाद्या उंच ठिकाणी उभे राहून पाहिले असता मृत समुद्राच्या दक्षिण दिशेला काही काळ्या पडलेल्या जंगलासारखे दृष्य दिसते. ते पडीक इमारतीचे अवशेषू असावेत असे वाटते. भूगोल विषयात संशोधन करणारे अनेक विद्यार्थी व संशोधक या मृत समुद्राच्या सभोवती फिरून आपले प्रबंध लिहित असतात.

ही सर्व चर्चा भौगोलिक शास्त्रज्ञांच्या दृष्टिकोनातून झाली. आता आपण या मृत समुद्रास अरबी भाषेत 'लूत समुद्र' असे का म्हटले आहे ते पाहू. कथा अशी आहे–

ज्या भूकंपाबद्दल शास्त्रज्ञांनी मागे वर्णन केले आहे तो भूकंप कसा झाला? हा भूकंप इस्लामचे प्रसिध्द नबी माननीय 'लूत' यांच्या काळात झाला. असा इस्लामी इतिहास आहे. हा भूकंप नसून त्याद्वारे अल्लाहचा 'क्रोध' प्रगट झाला होता. हा क्रोध का प्रगट झाला? या भूकंपाची कथा कशी घडली? ही कथा मानवाला धडा देण्यास पुरेशी आहे. अल्लाहच्या प्रेषितांवर विश्वास न ठेवल्यास काय घडते याचे पुरेपूर उदाहरण आहे.

इस्लामचे एक मोठे प्रेषित इब्राहीम (अ) हे होऊन गेले. त्यांनी इस्लामच्या स्थैर्यासाठी व प्रचारासाठी तीन केंद्रे स्थापन केली. त्यापैकी एक केंद्र या मृत समुद्राच्या ठिकाणी होते. त्या केंद्राचे प्रमुख म्हणून त्यांनी माननीय लूत यांची नेमणूक केली.

याच 'लूत'ना अल्लाहने आपला प्रेषित केले होते. हे फक्त अल्लाहच्या आदेशावरून माननीय इब्राहीम यांना माहीत होते.

माननीय 'लूत'च्या काळात मृत समुद्राच्या ठिकाणी सुपीक व वृक्षांनी बहरलेला हरीत पट्टा होता. तो प्रदेश हिरवागार होता. तेथील जनतेवर अल्लाहने जणू सुखाची बरसात केली होती. त्याचा परिणाम म्हणून येथील लोक मौज मजा करण्यात आनंद मानीत होते. या आनंदात भर पडावी म्हणून त्यांनी अनेक प्रकारची सुखाची साधने निर्माण केली होती. त्या साधनाच्या उपभोगात ते फार काळ रममाण होत नसत. त्या सुखाच्या साधनाचा ते त्याग करीत व नवीन सुखाची साधने शोधीत. शेवटी सैतानाने तेथील रहिवाशांच्या मनात प्रवेश केला. त्याने तेथील रहिवाशांना अशा एका तथाकथित सुखाच्या साधनात फसवले की त्यामुळे तेथील रहिवाशांवर अल्लाहच्या क्रोधाची वीज कोसळली. माननीय 'लूत' यांना तेथील जनतेवर 'नबी' म्हणून पाठविले होते. त्यामुळे तेथील रहिवाशांना 'लूत' जाती (जमात) हे नाव दिले गेले होते. माननीय लूत यांच्या काळी हा सुखोपभोगी समाज अशा एका विचित्र सवयीने पछाडला गेला होता. या सवयीच्या आहारी लूत समाज कसा गेला. हे समजत नाही किंवा त्या सवयीचे कोणत्या शब्दांत वर्णन करावे हे आम्हास कळत नाही. पवित्र कुरआनत या सवयीचे जे वर्णन आले आहे. त्याचे भाषांतर एका प्रसिध्द विद्वानाने केले आहे. ते त्यांच्याच शब्दांत आम्ही पुढे देत आहोत. 'माननीय लूत' म्हणतात-

*''काय तुम्ही जगातील निर्मितीपैकी पुरुषांजवळ जाता? आणि तुमच्या पत्नींमध्ये तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यासाठी जे काही निर्माण केले आहे ते सोडून देता? किंबहुना तुम्ही लोक तर मर्यादा ओलांडून गेला आहात.''*

*—सूरह अश-शुअरा २६:१६५ ते १६६*

वरील दिव्य कुरआनातील सूरह अश् शुअराच्या भाषांतरावरून एक अत्यंत वाईट अर्थ आमच्या समोर येतो. पुरुषाने पुरुषांशी संभोग करणे अत्यंत तिरस्करणीय व अल्लाहच्या नियमांचे उल्लंघन करणे होय. लूत जमातीमध्ये हाच फक्त दोष होता असे नव्हे तर ती जमात अनेक घृणास्पद दोषांनी बरबटली होती. ती जमात वाटमारीही करीत असे. ते सदाचारापासून दूर गेले होते. ते महालात राहून अनाचार करीत होते. त्यांच्यामध्ये अनेक दोष आढळून येत होते.

त्या लोकांना 'माननीय लूत' हे त्यांच्या दोषाबद्दल वेळोवेळी उपदेश करीत.

दुष्कृत्यापासून दूर राहण्यास सांगत. अल्लाहची भीती बाळगण्याचे ही आवाहन करीत. परंतु लूत जमातीचे वर्तन सीमा ओलांडून पुढे गेले होते. 'माननीय लूत' यांच्या उपदेशाचा त्यांच्यावर फारसा परिणाम होत नसे.

उलट 'माननीय लूत' व त्यांच्या कुटुंबियांसमवेत त्यांना मानणारे त्यांचे सहकारी यांना वस्तीबाहेर हाकलून देण्याचा मनसुबा तेथील गैरवर्तन करणाऱ्या लोकांनी केला. ते अत्यंत दुर्वर्तनी होते. त्यांनी 'माननीय लूत' यांचा परिवार व त्यांच्या सहकाऱ्यांना बाहेर हाकलून देण्याचे ठरविले. ही त्यांच्या अत्याचाराची परिसीमा होती. शेवटी त्यांनी माननीय लूत व त्यांच्या सहकाऱ्यांना वस्ती सोडण्याचे आदेश दिला.

त्या वेळी अल्लाहने माननीय लूत यांच्याकडे दोन देवदूत पाठविले. त्यांनी 'माननीय लूत' यांना अल्लाहचा आदेश ऐकवला, "हे लूत! तुम्ही या शहरातून हिजरत (स्थलांतर) करा, आम्ही (अल्लाह) या जमातीला नष्ट करणार आहोत." हे दोन्ही देवदूत 'माननीय लूत' यांच्याकडे येताना दोन सुंदर तरुणांचे रुप घेऊन आले होते. दोन सुंदर तरूण 'माननीय लूत' यांच्याकडे आल्याची बातमी गैरवर्तन करणाऱ्या जमातीच्या लोकांना कळली. त्या लोकांनी त्या दोन सुस्वरुप तरुणांचे (देवदूतांचे) त्यांचा संग घेण्याच्या अभिलाषेने अपहरण केले. त्या दुष्ट लोकांना, हे दोन सुस्वरूप तरूण त्या दुर्वर्तनी जमातीस नष्ट करण्यास आले आहेत, हे माहीत नव्हते.

'माननीय लूत' यांना कल्पना होती की त्यांची सर्व जमात मृत्यूच्या दारात उभी आहे. त्यांनी पुन्हा एकदा सर्व जमातीस जागे करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. ती सर्व जमात त्या दोन सुस्वरुप तरुणांवर इतकी भाळली होती की ते त्या सुस्वरुप तरुणांच्या उपभोगासाठी उतावीळ झाले होते. शेवटी त्या देवदूतांनी 'माननीय लूत' यांना अल्लाहची आज्ञा पुन्हा ऐकवली, "हे लूत, तुम्ही तुमच्या सर्व लोकांसह येथून स्थलांतर करा. आता आम्हास अल्लाहच्या आदेशाची अंमलबजावणी करावयाची आहे."

'माननीय लूत' मनाने फार हळवे होते. पण अल्लाहच्या आज्ञेमुळे त्यांनी त्यांच्या लोकांसह ते शहर सोडले. काही थोड्या मुस्लिमांसह 'माननीय लूत' शहराबाहेर पडले. बाकी सर्व दुष्टवर्तनी लोकांनी त्यांच्याबरोबर जाण्यास नकार दिला.

ती उषा:कालची वेळ होती. सूर्योदय होण्यास फारसा विलंब नव्हता. 'माननीय

लूत' आणि त्यांचे सहकारी शहराबाहेर पडले. त्यानंतर एक जोराचा स्फोट झाला. एक मोठे वादळ घोंघावू लागले. वादळाबरोबरच त्या लूत जमातीवर दगडाचा जोरदार मारा सुरू झाला. तेथील भूमीसुध्दा त्या जमातीचे पातक सहन करू शकली नाही. एक हृदय कंपविणाऱ्या आवाजाबरोबर 'लूत' जमात राहत असलेला जमिनीचा भाग उद्रेकाने उडाला. ज्या जमिनीवर लूत जमात दुष्कृत्ये करीत होती ती क्षणार्धात नाहीशी झाली. मग त्या लोकांचे काय झाले ते आजपर्यंत कोणालाही काही कळले नाही.

त्या भयानक घटनेबाबत ते दोन देवदूत माननीय इब्राहिम (अ) यांना अगोदरच कल्पना देऊन आले होते. त्यानंतर ते तेथून लूत जमातीच्या पूर्वस्थळाकडे आले, तेव्हा त्यांना मोठमोठे महाल, घरेदारे नष्ट झालेली दिसली. थोड्याच वेळात त्या प्रदेशात पाणी शिरू लागले. त्या जागेस मृत समुद्राचे आजचे रुप प्राप्त झाले. या मृत समुद्रात आजही मोठ्या प्रमाणात ध्वस्त झालेल्या नगरीचे अवशेष पाहावयास मिळतात. कधी काळी हा प्रदेश वसाहतीखाली आनंदाने राहत असावा याचे ध्वस्त अवशेष हे प्रमाण आहे.

शास्त्रज्ञांचा अंदाज आहे की माननीय येशू ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षे ही घटना घडली असावी. थोडक्यात, ४ ते ५ हजार वर्षांपूर्वी ही वस्ती अस्तित्वात असावी व त्याच काळात म्हणजे 'माननीय लूत' यांच्या हयातीत ही घटना घडली असावी. एखाद्या मोठ्या भूकंपामुळे या भागात प्रचंड उलथापालथ झाली असावी.

या शहराचे लोक दुराचारी होते. त्या लोकांच्या दुराचारामुळे अल्लाहने हे शहर तर नष्ट केलेच आणि त्या ठिकाणी विषारी जलाचा मृत समुद्र तयार झाला.

*"अल्लाह दुराचारी लोकांना शिक्षा करतो."*

# कैसर व खुस्रोचे युध्द

कैसर रोमच्या बादशहास म्हणतात. इराणच्या बादशहाचे खुस्रो असे नाव आहे. इस्लामचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या काळात कैसर व खुस्रो यांच्यात फार मोठे युध्द झाले. या युध्दाच्या जय–पराजयाबाबत पवित्र कुरआनमध्ये भाकित केले आहे. ते भाकित (भविष्य) वाचकांनी वाचावे असे मला वाटते म्हणून ते आपणासमोर भाषांतर करून मांडीत आहे.

*''अलिम लाऽऽम मीऽऽम, 'रोमन' लोक जवळच्या भूमीवर पराभूत झाले आहेत आणि आपल्या या पराभवानंतर काही वर्षांच्या आत ते विजयी होतील. अल्लाहचाच अधिकार आहे अगोदरसुध्दा व नंतरदेखील, आणि तो दिवस असा असेल जेव्हा अल्लाहने प्रदान केलेल्या विजयावर मुसलमान आनंद व्यक्त करतील. अल्लाह विजय प्रदान करतो ज्याला इच्छितो आणि तो जबरदस्त व दयावान आहे. हे वचन अल्लाहने दिले आहे. अल्लाह कधीही आपले वचन भंग करीत नसतो. परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत.''* *(३०: १ - ६)*

हे भविष्य समजून घेण्यासाठी त्या ऐतिहासिक घटनेवर एक दृष्टीक्षेप टाकण्याची गरज आहे. वरील सूरहमध्ये अगदी स्पष्टपणे भविष्यातील घडणाऱ्या घटनेचे भविष्य कथन केले आहे.

प्रेषित मुहम्मद (स.) यांना प्रेषित्व प्राप्त होण्यापूर्वी आठ वर्षे अगोदरची ही घटना आहे. रोमच्या कैसर मॉरिसच्या विरोधात त्याच्या राज्यातच बंडाळी माजली. त्या वेळी फोकस नामी एका इसमाने कैसर मॉरिसच्या सिंहासनाचा कब्जा घेतला. त्या फोकसने कैसर मॉरिसच्या डोळ्यांसमोर त्याच्या पाच पुत्रांची कत्तल केली. त्यानंतर फोकसने कैसर मॉरिसची पत्नी व तीन मुलींनाही यमसदनास पाठविले. जेव्हा कैसर व त्याच्या पाच मुलांची कत्तल केली तेव्हा राजधानी कॉन्स्टंटीनोपल येथे भर बाजारात त्यांची मुंडकी (शीर) लटकावून ठेवली जेणेकरून सर्वांना धाक वाटावा.

रोमच्या या पराभवामुळे इराणच्या खुस्रो परवेज यास रोमवर हल्ला करण्याची आयतीच संधी मिळाली. खुस्रो हा अग्निपूजक होता. तर रोमन माननीय ईसा (येशू ख्रिस्त) यांना मानणारे एकेश्वरवादी होते. खुस्रोही एकेश्वरवाद्यांचा नायनाट करण्याच्या विचाराचा होता. कारण खुस्रो हा कैसर मॉरिसच्या मदतीनेच इराणचा बादशहा बनला होता. त्यामुळे खुस्रो कैसरला बापासमान मानत होता. त्यामुळे बदला

घेण्याच्या बहाण्याने फोकसवर हल्ला करण्याचा मनसुबा त्याने रचला. त्याने जाहीर केले की "मला मदत करणाऱ्या बापासमान कैसर मॉरिसचा वध करणाऱ्या फोकसचा वध करून त्याचा बदला घेईन." त्यानंतर त्याने रोमच्या राजाविरुध्द इ. स. ६०३ मध्ये युध्द पुकारले.

फोकसने खुस्रोच्या सैन्यास तोंड देण्याचा प्रयत्न केला. पण त्याला त्यात यश मिळाले नाही. खुस्रो फोकसला हुलकावण्या देत देत रोमजवळील मोठी शहरे जिंकत पुढे कूच करीत होता. हे पाहून रोमच्या काही उच्चपदस्थ सरदारांनी आफ्रिकेच्या गव्हर्नरकडे मदत मागितली. त्याने ती मान्य करून त्याचा मुलगा हर्क्युलस यास मदतीसाठी पाठविले. हर्क्युलसने रोमन सरदारांच्या आमंत्रणाप्रमाणे मोठ्या सैन्यासह फोकसवर चाल करून कॉन्स्टटिनोपलला वेढा घातला व ते जिंकून घेतले. फोकसला कैद केले. फोकसने कैसर मॉरिसबरोबर जसा व्यवहार केला होता तसाच व्यवहार हर्क्युलसने फोकसशी केला. त्याने फोकस व त्याच्या परिवाराची कत्तल केली, ही घटना इ. स. ६१० मध्ये घडली.

खुस्रोने मानलेल्या बापाच्या वधाचा बदला घेण्यासाठी रोमविरुध्द युध्द पुकारले होते. फोकसच्या मृत्यूनंतर खुस्रोने युध्द थांबविणे योग्य होते, परंतु त्याने तसे केले नाही. हर्क्युलसशी तह करून शांतता निर्माण करण्याऐवजी त्याने युध्द पुढे चालूच ठेवले. त्याने आता इराणचा झरत्रुष्टीयन धर्म (अग्नीपूजक) विरुध्द व ख्रिश्चन धर्म असे स्वरुप देऊन ख्रिश्चन धर्मियांना सतावण्याचे सत्र चालूच ठेवले. त्याचप्रमाणे २६ हजार यहुद्यांनीही (ज्यूंनी) खुस्रो परवेजच्या सैन्यात भरती होऊन ख्रिश्चनांचा नायनाट करण्याचा विडा उचलला.

हर्क्युलस रोमचा बादशहा झाल्याबरोबर त्याला प्रथम बातमी मिळाली ती इराणी लोकांनी हल्ला करून पूर्वेकडील प्रदेशावर ताबा मिळवला. त्यानंतर इ. स. ६१३ मध्ये दमिश्क इराणने जिंकून घेतले. त्यानंतर इ. स. ६१४ मध्ये बैतुल मुकद्दिसवर हल्ला करून ९० हजार ख्रिश्चनांना कंठस्थान घातले. त्यांनी जणू त्या शहरांत धुमाकूळ घालून प्रलयच घडविला. तेथील चर्चेस (ख्रिश्चन प्रार्थनागृहे) जाळून, पाडून टाकली. ते संपूर्ण शहर बरबाद केले. तेथील येशू ख्रिस्ताने ज्या क्रूस (क्रास-सलीब) वर शेवटचा श्वास घेतला होता. तो क्रॉस उपटून त्याने बरोबर नेला. त्यावर ख्रिश्चनांचा विश्वास होता. त्यामुळे ख्रिश्चन जगत हादरून गेले. त्याने बैतुल मुकद्दिसमध्ये लिहले, "तू म्हणतोस की आमचा आमच्या 'रब'वर विश्वास आहे.

तुझ्या 'रब'ने माझ्या हातून यरूशलेमचे संरक्षण का केले नाही?'' याप्रमाणे फुशारकी मारीत खुस्रो परवेजने इजिप्तच्या सरहद्दीपर्यंतचा भाग जिंकून घेतला. त्या अवधीत त्याने अनेक धर्मगुरू (पाद्री वगैरे) पकडून नेले. आता परवेजवर गर्वाने आक्रमण केले. गर्वाने त्याने वरील लेख (शिलालेख) यरूशलेममध्ये लिहला.

त्याच वेळी एकेश्वरवादी (तौहिद) मुस्लिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या विचाराने प्रभावित होऊन एकत्र येऊ लागले होते. मक्केतील मूर्तिपूजक कुरैशांनी मक्केतील मुस्लिमांच्या एकेश्वरवादास प्रचंड विरोध सुरू केला होता. ते म्हणत असत, ''ज्याप्रमाणे अग्नीपूजक इराणी खुस्रोने ख्रिश्चनांना पराभूत केले आहे, त्याप्रमाणे आम्हीही एकेश्वरवादी प्रेषित मुहम्मद (स.) व त्यांच्या अनुयायींचा पराभव करू. त्यासाठी आम्ही वेळ पडल्यास अरबी मूर्तिपूजकांचीही मदत घेऊ.

रोम व इराणी यांच्या या युध्दामध्ये मुस्लिमांची सहानुभूती रोमच्या ख्रिश्चनांकडे होती. तर अरबी मूर्तिपूजक कुरैशांची सहानुभूती अग्नीपूजक इराणी खुस्रो परवेजकडे होती. याचे कारण म्हणजे खुस्रो परवेजने या युध्दास धार्मिक रंग दिला होता. तो राज्य वाढविण्याच्या इच्छेने, त्यास धार्मिक विद्वेष पसरून स्वत:चा फायदा करून घेत होता. त्याने कैसरला पत्र लिहून कळविले होते की ''जर तो स्वत:ला साखळदंडात जखडून घेऊन माझ्यासमोर हजर झाला व त्याने (कैसरने) अग्निपूजा स्वीकारली तरच त्याला जीवदान मिळेल.''

इराणी अग्नीपूजक होते ते ईश्वराऐवजी अग्नीपूजा करीत. तसेच त्यांना सहकार्य करणारे अरबी मुश्रिक (अनेक देवता मानणारे) होते. ते एका ईश्वराऐवजी (अल्लाह शिवाय) अनेक देवीदेवतांची पूजा करणारे होते. थोडक्यात इराणी अल्लाहवर विश्वास न ठेवणारे अनेकेश्वरवादी होते. याच्या नेमके उलट मुस्लिम व ख्रिश्चन दोन्हीही धर्म एकेश्वरवादाचा पुरस्कार करणारे होते. दोन्ही धर्मांचा त्यांच्या प्रेषितावर व कयामतच्या दिवसावर व आखिरतच्या (न्यायाच्या) दिवसावर विश्वास होता. याप्रमाणे दोन्ही धर्म मिळते जुळते होते. याच कारणामुळे मुस्लिमांची ख्रिश्चनांबद्दल सहानुभूती होती. याच वेळी मक्केमध्ये नवमुस्लिमांना मूर्तिपूजक कुरैश त्रास देत होते. त्या वेळी ॲबिसिनियाचा बादशहा ख्रिश्चन होता. त्यांचीही एकेश्वरवादी मुस्लिमांबद्दल सहानुभूती होती. म्हणून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी नवमुस्लिमांना स्वसंरक्षणार्थ ॲबेसिनीयात जाण्याचे आदेश दिले होते. त्याप्रमाणे अनेक मुस्लिमांनी ॲबेसिनियात आश्रय घेतला होता.

अशी स्थिती असतानाच प्रेषित मुहम्मद (स.) यांना अल्लाहकडून वही (आकाशवाणी) प्राप्त झाली. पवित्र कुरआनात अध्याय (सूरह) ३० मध्ये आयत (श्लोक) क्रमांक १ ते ६ मध्ये नोंदली आहे. या अध्यायाचे नावच अर-रूम असे आहे. ती अगोदर लिहिलीच आहे. त्यामध्ये रोमी पराभूत झाले आहेत. परंतु लौकरच त्यांना विजय प्राप्त होईल अशी अल्लाहची 'वचन'नोंद आहे. ही भविष्यवाणी कुरआनात घटनेपूर्वी नोंदली गेली आहे व ती पुढे खरी ठरली, हेच या भविष्याचे वैशिष्ट्य आणि एक ईश्वरी चमत्कारही आहे. जेव्हा ख्रिश्चनांना विजय मिळेल तेव्हा मुस्लिमांनाही मूर्तिपूजकांवर विजय मिळेल. जेव्हा ही भविष्यवाणी केली गेली तेव्हा ख्रिश्चन व मुसलमानांच्या विजयाचे कोणतेही चिन्ह दृष्टीपथात नव्हते. या वेळी मुस्लिमांची संख्याही अत्यंत कमी होती. त्यांचाही मक्केच्या कुरैशांनी छळ चालविला होता. त्यांना मक्केबाहेर हाकलण्याचे सत्र कुरैशांनी अवलंबिले होते. त्याच वेळी कैसरचा पराजयावर पराजय होत होता. पूर्ण इजिप्त इराणी सैन्याने जिंकून घेतला होता. (इ. सन ६१६) कॉन्स्टंटिनोपलमध्ये इराणी झेंडा फडकू लागला होता. इराणी धाकाने सर्वत्र गहजब झाला होता. खुस्रोकडे अनेक जमातींनी विनंतीअर्ज केले होते की, ''आम्ही कशाही परिस्थितीत तुमच्याशी तडजोड करु इच्छितो. परंतु खुस्रोने त्याकडे कानाडोळा केला. उलट त्याने मागे लिहल्याप्रमाणे, कैसरने स्वत:स साखळ दंडाने जखडून स्वत:समोर हजर राहण्याचे व अग्निपूजकाचा धर्म पत्करण्याची आज्ञा दिली.

मक्केच्या मुश्रिकांनी (मूर्तिपूजकांनी) पवित्र कुरआनचे भविष्यकथन ऐकून त्याची खूप चेष्टा केली. मक्केचा उबई बिन खलफने जो मूर्तिपूजक होता, त्यांने अबू बकर यांच्याशी शर्यत लावली, ''रोमनचा कैसर जिंकला तर मी तुम्हाला (अबू बकर यांना) दहा उंट देईन. मात्र रोमचा कैसर हरला व खुस्रो परवेज जिंकला तर तुम्ही मला दहा उंट द्यायचे.'' अशी दहा दहा उंटांची शर्यत लावली. प्रेषित मुहम्मद (स.) यांना जेव्हा या शर्यतीबद्दल कळले, तेव्हा ते म्हणाले, कुरआनात दहा वर्षांच्या आत हे शब्द आले आहेत. ते शब्द अरबीमध्ये 'विज़्अ सिनीन' असे आहेत. विज़्अचा अर्थ अरबी भाषेत दहाचे आत असा होतो. म्हणून तुम्ही जुनी शर्यत बदलून तीत दहा वर्षांच्या आत असे शब्द घाला व दहा उंटांऐवजी १०० उंट देण्याचे ठरवा. त्याप्रमाणे अबू बकर यांनी उबई बिन खलफशी पुन्हा शर्यत लावली.

इसवी सन ६२२ मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) हिजरत (स्थलांतर) करून मक्केहून मदीनेस गेले. त्याच वेळी हर्क्युलस गुप्तपणे कॉन्टंटिनोपलहून काळ्या समुद्रमार्गे

तरबजूनकडे निघाला. तेथे त्याने इराणवर मागून हल्ला करण्याची तयारी केली. त्याने इ. स. ६२३ मध्ये आर्मेनियावर आक्रमण केले. इ. सन ६२४ मध्ये आझरबैजान येथे येऊन पोहोचला. तेथून त्याने अग्नीपूजकांचे श्रध्दास्थान असलेल्या अर्मेनिया शहरात प्रवेश करून झरत्रुष्टाचे जन्मस्थान उद्ध्वस्त केले. इराणी अग्नीपूजकांचे सर्वांत मोठे अग्नीकुंडही उद्ध्वस्त केले. याच वर्षी मुस्लिमांशी मूर्तिपूजकांचे बद्र येथे युध्द झाले. त्यातही मुस्लिम विजयी झाले. याप्रमाणे पवित्र कुरआनमधील भविष्ये खरी ठरली. ही भविष्ये दहा वर्षांच्या आत खरी ठरली.

त्यानंतर रोमच्या लष्कराने इराणच्या लष्करावर दबाव वाढविला. बिनवा येथे इ. सन ५२७ मध्ये निर्णायक युध्द झाले. त्यात रोमन सैन्याने इराणी सैन्याचे कंबरडे मोडले. त्यानंतर रोमन सैन्याने इराणची महत्त्वाची ठाणी उद्ध्वस्त केली. रोमन सैन्य आता इराणच्या राजधानीजवळ आले. त्याच वेळी खुस्रो परवेजच्या घरात फूट पडली. बंडाळी माजली. त्याला कैद केले गेले. त्याच्या डोळ्यांसमोर त्याच्या अठरा मुलांची कत्तल केली गेली. खुस्रो यास कैदेत टाकले गेले. तेथे होणाऱ्या त्रासाने अखेर त्यांचा मृत्यू झाला.

त्याच वर्षी मक्केचे कुरैश आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यात हुबैदिया येथे तह झाला. यालाच पवित्र कुरआनात 'फतह मुबिन' म्हटले आहे. कुरआनातील भविष्याप्रमाणे हे घडले. त्यानंतर खुस्रोच्या मुलांनी रोमनांना त्यांचा पवित्र क्रॉस जो खुस्रोने जबरदस्तीने पळविला होता तो परत केला.

कुरआनातील भविष्याप्रमाणे हे सर्व नंतर घडून आले. त्यामुळे अरबातील अनेक मूर्तिपूजकांनी इस्लाम स्वीकारला. या वेळी माननीय अबू बकर यांच्याशी १०० उंटाची पैज लावणारा उबई बिन खलपाच्या मुलांनी १०० उंट माननीय अबू बकर यांना देऊन हार मान्य केली व कुरआनच्या भविष्याबद्दल आदर व्यक्त केला.

माननीय अबू बकर यांना उबई बिन खलफच्या मुलांनी १०० उंट दिल्यानंतर अबू बकर प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे गेले. त्यांनी ते उंट सदका (ओवाळून ठाकले) देऊन दान करण्यास सांगितले. त्याप्रमाणे अबू बकर यांनी ते उंट दान केले.

अल्लाह कृपावंत आहे. अल्लाह वचन पाळणारा आहे.

याउप्पर अल्लाहला जे मानत नाहीत हा त्यांचा दोष आहे.

**✻ समाप्त ✻**